

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

संपादक : प्र० ना० परांजपे
संपादन-सल्लागार : अशोक रा० केळकर, कृष्ण श्री० अर्जुनवाडकर, आशा मुंडले,
द० भि० कुलकर्णी, मॅक्सीन बर्नसन
संपादन-समिती : प्र० ना० परांजपे (प्रमुख), नीलिमा गुंडी, मृणालिनी शहा,
विजय पाध्ये, आनंद काटीकर
कार्यकारी मंडळ सदस्य व पदाधिकारी : प्रा० प्र० ना० परांजपे, अध्यक्ष; डॉ० मृणालिनी शहा, प्रा० आनंद काटीकर, कार्यवाह, श्री० विजय पाध्ये, सहकार्यवाह; श्रीमती विजया चौधरी, कोषाध्यक्ष; डॉ० नीलिमा गुंडी, सदस्य; प्रा० रंजना फडके, सदस्य; डॉ० मॅक्सीन बर्नसन, सदस्य; डॉ० प्रभाकर जोशी, सदस्य; डॉ० प्रमोद तलगेरी, सदस्य (स्वीकृत); डॉ० मनोहर जाधव, सदस्य (स्वीकृत).
लेखन व परीक्षणार्थ पुस्तके पाठविण्याचा पत्ता : प्र० ना० परांजपे, सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007.
दूरभाष : (020) 2569 4617 भ्रमणभाष : 94225 09638
प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :
आनंद काटीकर, द्वारा, मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004. भ्रमणभाष : 94216 10704
मुद्रण-स्थळ : एम० आर० ॲण्ड कं०, सदाशिव पेठ, पुणे 411 030. दूरभाष : (020) 2447 5939

मराठी अभ्यास परिषदेच्या **www.marathiabhyasparishad.com** या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : चित्तरंजन भट - 93731 04903 विजय पाध्ये - 98220 31963.

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. जानेवारी २०१०पासून वार्षिक वर्गणी - विद्यार्थ्यांसाठी रु० ७५/-, व्यक्तींसाठी एका वर्षास रु० १००/-; पंचवार्षिक वर्गणी रु० ४५०/-. संस्थांसाठी एका वर्षास रु० १५०/-; पंचवार्षिक वर्गणी रु० ६५०/-.
(२) मराठी अभ्यास परिषदेची आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु० १,०००/- आणि नोंदणी शुल्क रु० १००/-. आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.
(३) पैसे भरण्याबद्दल सूचना : वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. कृपया मनिऑर्डर पाठवू नये. (पाठवल्यास आपला पत्ता पिनकोड क्रमांकासह न विसरता लिहावा.) धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत रु० ५०/- वटणावळ अधिक घालावी. धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.
(४) जानेवारी २०१०पासून जाहिरातीसाठी दर : पूर्ण पान रु० ३,०००/-. अर्धे पान रु० २,०००/-. आवरण-पृष्ठ (क्र० ४ = मलपृष्ठ) रु० ५,०००/-. विशेष रंगीत पृष्ठ रु० १०,०००/-

प्रकाशन : त्रैमासिक : जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी)
सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.

**या अंकाची किंमत रु० २५/-**

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका

अभिनंदन

# वसंत आबाजी डहाके

**प्र० ना० परांजपे**

साहित्य अकादमीच्या या वर्षीच्या ग्रंथपुरस्कारासाठी (एक लाख रुपये) श्री० वसंत आबाजी डहाके यांच्या 'चित्रलिपी' या कवितासंग्रहाची निवड करण्यात आलेली आहे. पण केवळ कवी एवढीच डहाक्यांची ओळख नाही. कवीप्रमाणेच ते कादंबरीकार, चित्रकार, साहित्य व संस्कृती समीक्षक व कोशकारही आहेत. 'संक्षिप्त मराठी वाङ्मयकोश' (२ खंड), 'वाङ्मयीन संज्ञा-संकल्पना कोश', 'निवडक सदानंद रेगे यांचे संपादन', 'कविता विसाव्या शतकाची' व 'शालेय मराठी कोश' यांचे सहसंपादनं, कविता म्हणजे काय? (१९९१), कवितेविषयी (१९९९), 'समकालीन साहित्य' (१९९२) इ० समीक्षाग्रंथांचेही लेखन त्यांनी केले आहे.

त्यांचा जन्म ३० मार्च १९४२ रोजी बेलोरा (जि० यवतमाळ) येथे झाला. राज्य मराठी विकास संस्थेत ते काही काळ उपसंचालक होते. मुंबईच्या एलफिन्स्टन महाविद्यालयातून मराठीचे प्राध्यापक म्हणून सेवानिवृत्त झाल्यानंतर आता ते अमरावती येथे राहतात.

'योगभ्रष्ट' (१९७२), 'शुभवर्तमान' (१९८७), शुनःशेप (१९९६) व 'चित्रलिपी' हे यांचे कवितासंग्रह, 'अधोलोक' (१९७५) व 'प्रतिबद्ध आणि मर्त्य' (१९८१) या कादंबऱ्या, 'यात्रा-अंतर्यात्रा' (२०००) हे ललितलेखन ही त्यांची साहित्यसंपदा. डहाक्यांची कविता आत्माविष्कार करते, पण युगभान असणाऱ्या, अस्तित्ववाद व मार्क्सवाद यांनी पोसलेल्या प्रातिनिधिक 'मी'चा हा आत्माविष्कार आहे. मानवी दुःख, माणसाचे एकाकीपण, जीवनातील अस्थिरता, दहशत, भय, पराधीनता, असहायता यांचा प्रत्यय त्यांच्या कवितेतून येतो. त्यांच्या कवितेतील निराश अंतःस्वर व त्यांच्या सांस्कृतिक समीक्षेतून व्यक्त होणारी दृढ बांधिलकी यांच्यामध्ये विरोध दिसतो. त्यांची गद्य व कवितेतील भाषा वैशिष्ट्यपूर्ण आहे.

■

सी-1, सूरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007.
दूरभाष : (020) 2569 461, भ्रमणभाष : 094225 09638






अनुक्रमणिका

# युनिकोड संकेतप्रणालीसंबंधी...

भारतात आणि जगभर युनिकोड ही संकेतप्रणाली वापरली जात असल्याने संगणकीय व्यवहार करणे सोयीचे झाले आहे. ह्या संकेतप्रणालीनुसार मराठी देवनागरी लिपीचा वापर करण्याच्या दृष्टीने येथे काही अपेक्षा व्यक्त केल्या आहेत.

भारतातील सर्व राज्यांच्या शासनांना परस्परांतील तसेच केंद्र शासनाशी संगणकीय व्यवहार सुसूत्रतेने व्हावा म्हणून केंद्र शासनाने युनिकोड संकेतप्रणालीचा वापर करणे अनिवार्य केले आहे. पण महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळासाठी युनिकोडचा वापर करण्यात आलेला नाही, त्यामुळे संकेतस्थळावरील मराठी भाषेतील मजकुरासाठी जे टंक वापरण्यात आले आहेत ते टंक वापरकर्त्यास आधी आपल्या संगणकावर उतरवून स्थापन करणे आवश्यक ठरते.

संकेतस्थळाला भेट देताच सध्या प्रथम इंग्रजी भाषेतील मजकूर असलेले मुखपृष्ठ प्रकट होते, त्याऐवजी प्रथम मराठी भाषेतील मजकुराचे मुखपृष्ठ प्रकट होणे आवश्यक आहे. मराठी भाषेतील मजकुराला पर्याय म्हणून इंग्रजी मजकूर उपलब्ध होण्यास हरकत नाही.

महाराष्ट्र शासनाच्या विविध खात्यांमध्ये, विभागांमध्ये, निमशासकीय संस्था, उपक्रम, स्थानिक स्वराज्य संस्था (महानगरपालिका, नगरपालिका, नगर परिषदा, ग्रामपंचायती वगैरे), शासनाने अधिकृत केलेल्या स्वायत्त महामंडळांसारख्या संस्था, अनुदानित व विनाअनुदानित शासनमान्य शिक्षणसंस्था, बँका व इतर वित्तसंस्था, आणि जनतेचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंध येतो अशा सर्व राज्यशासकीय आस्थापनांच्या दैनंदिन व्यवहारासाठी जिथे जिथे संगणकाचा वापर केला जातो त्या सर्व ठिकाणी युनिकोड संकेतप्रणाली वापरून मराठीचा वापर करणे अनिवार्य केले पाहिजे. शासनाशी संबंधित सर्व व्यवहार 'ऑनलाइन' होण्यास त्यामुळे मदत होईल.

महाराष्ट्र ज्ञानमहामंडळाकडून राज्यभरात एमएससीआयटीच्या परीक्षा घेतल्या जातात. शासकीय सेवेत ही परीक्षा उत्तीर्ण असणे अनिवार्य केले गेले आहे. त्या अभ्यासक्रमात युनिकोड संकेतप्रणालीच्या साहाय्याने मराठीतून संगणकीय व्यवहार करण्यासाठी प्रशिक्षणाची सोय केली पाहिजे. सायबर कॅफेमधून, तसेच टंकलेखनाच्या सरावासाठी वा शासकीय परीक्षांसाठी चालवल्या जाणाऱ्या खासगी संस्थांमधूनही व्यापक स्तरावर युनिकोडानुकूल टंकांचा वापर करण्याबाबत प्रसार होणे आवश्यक आहे.

**टंक :** सध्या मायक्रोसॉफ्टच्या विंडोज प्रचालन प्रणालीद्वारे (ऑपरेटिंग सिस्टिम) मराठी भाषेच्या लिपीसाठी 'मंगल' हा केवळ एकच टंक मुक्त स्वरूपात उपलब्ध करून दिलेला आहे. ह्या टंकात काही त्रुटी व दोष आहेत, ते दूर होणे गरजेचे आहे. मायक्रोसॉफ्टकडून 'मंगल'सारखे आणखीही काही टंक मुक्त स्वरूपात उपलब्ध झाले पाहिजेत.

मराठी लिपीसाठी विविध प्रकारचे टंक विकसित करून पुरविणाऱ्या सी-डॅक, मोड्यूलर वगैरे सर्व सॉफ्टवेअर निर्मात्यांना आपापले टंक युनिकोडित करून उपलब्ध करून देणे अनिवार्य करावे.

युनिकोडने 'ॲ' हा स्वतंत्र वर्ण म्हणून अलीकडे स्वीकारला आहे. आता मराठी देवनागरीत वापरल्या जाणाऱ्या 'ऱ' व 'ळ' ह्या वर्णांना कोड दिले जावेत. प्रत्येक भाषेच्या लिपीची काही आगळीवेगळी वैशिष्ट्ये असतात हे वास्तव स्वीकारून त्या त्या लिपीसाठी स्वतंत्र वर्ण वा टंक निर्माण केले गेले पाहिजेत. सारख्या *दिसणाऱ्या* लिप्यांना एकाच मापात देवनागरी असे संबोधून हिंदी, नेपाळी, कोंकणी, बोडो वगैरे इतर भाषांच्या लिप्यांतच समाविष्ट करणे योग्य नाही.

**कळफलक :** टंकयंत्रे व संगणक ह्यांच्या वापरासाठी लॅटिन/रोमी लिपीतील कळफलकातील क्वर्टी (QWERTY) वर्णव्यवस्था जगातील सर्व ठिकाणी प्रमाणभूत मानली गेलेली असल्याने कोणत्याही देशातील कुणाही व्यक्तीला कुठेही त्या कळफलकाचा वापर करताना अडचण भासत नाही. भारतातील विविध भाषांतील टंकनासाठी मात्र जितके सॉफ्टवेअर निर्माते तितक्या निरनिराळ्या वर्णव्यवस्था असलेले कळफलक आहेत; प्रत्येक सॉफ्टवेअर निर्मात्याला जी वर्णव्यवस्था शास्त्रशुद्ध व तांत्रिकदृष्ट्या सुयोग्य वाटते तिला अनुसरून त्याने आपला कळफलक विकसित करून तो वापरण्याची शिफारस वापरकर्त्यास केलेली आहे. अर्थात, त्या कळफलकासोबत रेमिंग्टन, गोदरेज, कृती, आकृती, फोनेटिक, इन्स्क्रिप्ट वगैरे इतरही पर्यायी वर्णव्यवस्थेचे कळफलक देऊन वापरकर्त्यांची गैरसोय टाळलेली असते. परंतु, भारतीय भाषांतील निरनिराळ्या लिप्यांसाठी सी-डॅक ह्या संस्थेने विकसित केलेला एकच एक इन्स्क्रिप्ट (इंडियन स्क्रिप्ट) हा कळफलक तांत्रिकदृष्ट्या योग्य व वापरकर्त्यांच्या दृष्टीने सुलभ असल्याने प्रमाणभूत मानला गेला आहे. म्हणून महाराष्ट्र शासनाने आपल्या अधिकारातील सर्व क्षेत्रांतील वापरकर्त्यांना तसेच निमशासकीय व खासगी क्षेत्रांतील वापरकर्त्यांना त्याच कळफलकाचा पुरस्कार करणे आवश्यक आहे. केंद्र शासनानेही ह्याच इन्स्क्रिप्ट कळफलकाचा वापर करण्यासंबंधी सूचना दिलेल्या आहेत.

अर्थात, सध्याचा इन्स्क्रिप्ट कळफलक हा निर्दोष नाही. त्यात खालील त्रुटी व दोष आढळतात व ते शासनाने सी-डॅकने दूर करायला हवेत. मराठी देवनागरी लिपीच्या संदर्भात ह्या इन्स्क्रिप्ट कळफलकात (१) 'ॲ', 'ऱ' व 'ळ' ह्या वर्णांचाही समावेश होणे अत्यावश्यक आहे. हे तीनही वर्ण महाराष्ट्र शासनाने अलीकडेच संमत केलेल्या सुधारित वर्णमालेमध्ये दर्शविलेले आहेत. (२) जोडाक्षरांची आडवी व उभी मांडणी करून सर्व प्रकारे शब्द टंकणे शक्य व्हायला पाहिजे. सध्या 'मंगल' हा टंक वापरून वर्णांची केवळ आडवी मांडणी करूनच शब्द (उदा० हट्ट, बुक्का) टंकता येतात. सर्व शब्द आडवी जोडणी, उभी जोडणी, हलन्तचिन्ह, परसवर्ण वगैरे योजून (हक्क, बट्टा, बद्दल, बद्दल, सन्त, प्रयत्न, कल्ला) विविध प्रकारे टंकता आले पाहिजेत. (३) सध्याच्या देवनागरी इन्स्क्रिप्ट कळफलकात पूर्णविराम व स्वल्पविराम ही दोनच विरामचिन्हे उपलब्ध आहेत. महत्त्वाची व सर्वसामान्यपणे वापरली जाणारी प्रश्नचिन्ह, उद्गारचिन्ह, अर्धविराम, द्विबिंदुचिन्ह, एकेरी व दुहेरी अवतरणचिन्हे, विसर्गचिन्ह, विकल्पचिन्ह, तसेच अधिक, गुणिले, बरोबर ही गणिती चिन्हे उपलब्ध नाहीत. ही चिन्हे मराठी देवनागरी इन्स्क्रिप्ट कळफलकात उपलब्ध करून देणे आवश्यक आहे.

विजय पाध्ये





अनुक्रमणिका

# पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन

वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम कलम डी १९(बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली, १९५६, नियम ८, नमुना ४ यांना अनुसरून 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन' या नियतकालिकाची मालकी व अन्य बाबींसंबंधीचे निवेदन :

१. प्रकाशनस्थळ : पुणे, महाराष्ट्र

२. प्रकाशनाची नियतकालिकता : त्रैमासिक जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी)

३. प्रकाशक व मुद्रकाचे नाव : आनंद काटीकर, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद
राष्ट्रीयता : भारतीय
पत्ता : द्वारा, मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंट्स, ४६/४ एरंडवणे, पुणे ४११ ००४
भ्रमणभाष : ९४२१६ १०७०४

४. मुद्रणस्थळ : एम०आर० अँड कंपनी, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७ ५९३९

५. संपादकाचे नाव : प्र०ना० परांजपे
राष्ट्रीयता : भारतीय
पत्ता : सी १, सूरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७
दूरभाष : ०२०-२५०९ ४६१७
भ्रमणभाष : ९४२२५ ०९६३८

मी, आनंद काटीकर, असे प्रतिज्ञापूर्वक सांगतो की वर दिलेला तपशील माझ्या माहिती व समजुतीप्रमाणे सत्य आहे.

आनंद काटीकर
कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद, प्रकाशक

■

# डॉ० द०भि० कुलकर्णी

प्र०ना० परांजपे

अखिल भारतीय मराठी साहित्यसंमेलनाच्या ८३व्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून डॉ० द०भि० कुलकर्णी यांची निवड अतिशय शांत, सुसंस्कृत व घटनात्मक पद्धतीने झाली. याबद्दल त्यांचे विशेष अभिनंदन. त्यांची साहित्यसमीक्षा, त्यांचा व्यासंग यांना असलेली निर्विवाद मान्यताच या निवडीतून व्यक्त झाली आहे.

वर्ष २७ अंक १पासून ते 'भाषा आणि जीवन'चे संपादन-सल्लागार आहेत. त्यापूर्वी त्यांनी भाषाविषयक सात लेख 'भाषा आणि जीवन' साठी लिहिले (वर्ष २३ अंक ३ व ४, वर्ष २४ अंक १, २, ३ व ४, वर्ष २५ अंक ४) त्यातून त्यांचे 'भाषाभान' (त्यांच्या सदराचे हेच शीर्षक होते) उत्तम रीतीने व्यक्त झाले आहे.

समीक्षक म्हणून ते आपल्या भूमिकेविषयी अतिशय जागरूक आहेत. सर्वसाधारणपणे 'समीक्षा' या पायघोळ झग्यात समीक्षेच्या सरहद्दीबाहेरचे अनेक विषय समाविष्ट केले जातात, अशी त्यांची धारणा आहे. आस्वादक समीक्षा, पाठचिकित्सा, लेखक-चरित्राधारित समीक्षा, वाङ्मयेतिहास, समाजशास्त्रीय चिकित्सा (उदाहरणार्थ स्त्रीवादी समीक्षा, दलित साहित्य समीक्षा) इत्यादी प्रकारच्या लेखनात समीक्षागुण असले तरी ती खऱ्या अर्थाने साहित्यसमीक्षा नव्हे असा त्यांचा युक्तिवाद आहे. साहित्यकृतीत सूक्ष्म, अविकसित स्वरूपात असलेली कलाबीजे जाणणे आणि त्यांच्याआधारे साहित्यकृतीत अनुस्यूत असलेली 'आंतरसंहिता' उलगडून दाखवणे हेच साहित्य-समीक्षेचे खरे व एकमेव कार्य आहे असा त्यांचा दावा आहे.

द०भिं०चा जन्म नागपूर येथे २५ जुलै १९३४ रोजी झाला. एम०ए० व पीएच०डी० या पदव्या, सुमारे ४० वर्षे अध्यापन, २६ विद्यार्थ्यांना पीएच०डी० पदवीसाठी मार्गदर्शन, ३६ ग्रंथांचे व लेखसंग्रहांचे लेखन, महाराष्ट्र शासनाच्या पाच वाङ्मयपुरस्कारांसह अनेक पुरस्कार, दोन गौरवग्रंथ या सर्वांतून द०भिं०चे कर्तृत्व व्यक्त होते. त्यामुळे अ०भा० साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपदी त्यांची निवड झाली याचे आश्चर्य वाटू नये.

■

सी-1, सूरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007.
दूरभाष : (020) 2569 461, भ्रमणभाष : 094225 09638










अनुक्रमणिका

# मराठीतील बहुपदीय क्रियापदे व क्रियाव्याप्ती विचार

अनघा भट-बेहेरे

क्रियाव्याप्ती ही व्याकरणिक कोटी मराठी व्याकरणाच्या अभ्यासकांच्या पुरेशा परिचयाची नाही. प्रस्तुत लेखात क्रियाव्याप्तीच्या आधाराने मराठीतील बहुपदीय क्रियापदांची समीक्षा करण्याचा प्रयत्न केला आहे. लेखात वापरलेल्या काही संज्ञांचे स्पष्टीकरण पुढे दिले आहे. लेख वाचताना त्याचा उपयोग होऊ शकेल.

**क्रियाव्याप्ती : Aspect.** काळ (tense) अथवा अभिवृत्ती (mood) यांप्रमाणेच फक्त क्रियापदांना लागू असणारी ही एक व्याकरणिक कोटी आहे. सहसा क्रियाव्याप्ती क्रियेकडे बघण्याचा एक दृष्टिकोन आपल्याला उपलब्ध करून देते. A verbal camera असे तिचे वर्णन केले जाते. पूर्ण व अपूर्ण ह्या द्वैतातूनच आपल्याला क्रियाव्याप्ती समजावून घेता येऊ शकते. पूर्ण क्रियाव्याप्तीची क्रियापदे क्रियेकडे एक अखंड, एकसंध घटना म्हणून बघतात. तर अपूर्ण क्रियाव्याप्तीची क्रियापदे क्रियेकडे एक टप्प्या-टप्प्याने उलगडत जाणारी प्रक्रिया म्हणून बघतात. पूर्ण क्रियाव्याप्तीच्या क्रियापदांच्या अर्थामध्येच क्रियेचा शेवट, तिचे पूर्णत्वाला जाणे अनुस्यूत असते. अपूर्ण क्रियाव्याप्तीची क्रियापदे सहसा क्रियेचे नामकरण फक्त करतात. अपूर्ण क्रियाव्याप्तीदर्शक क्रियापदांच्या अर्थामध्ये क्रियेच्या पूर्णत्वाचे, शेवटापर्यंत जाऊन मग ती क्रिया संपण्याचे कोणतेही सूचन नसते.

**क्रियाव्याप्ती विचार : Aspectology.** निरनिराळ्या भाषांमधील क्रियाव्याप्ती ह्या व्याकरणिक कोटीचा अभ्यास करणारी ज्ञानशाखा.

**सीमालक्ष्यी क्रियाव्याप्तीविधा : Aktionsarten/Sposoby deistviya.** पूर्ण क्रियाव्याप्ती भाषेमध्ये अनेक मार्गांनी तयार होते. भाषेमध्ये नेहमी आढळणारा प्रकार म्हणजे अपूर्ण क्रियाव्याप्तीदर्शक क्रियापदालाच उपसर्ग अथवा प्रत्यय लावून पूर्ण क्रियाव्याप्तीदर्शक क्रियापद बनवणे. पूर्ण क्रियाव्याप्तीचे निदर्शक म्हणून अनेक शब्दीय अथवा रूपीय चिन्हांचा वापर होतो. ही शब्दीय अथवा रूपीय चिन्हे स्वत:ची अशी खास वैशिष्ट्ये घेऊन येतात. ही वैशिष्ट्ये जर अपूर्ण क्रियाव्याप्तीदर्शक क्रियापदाशी मिळतीजुळती नसतील तर क्रियेच्या पूर्णत्वासोबत, तिच्या शेवटाकडे जाऊन संपण्यासोबतच क्रिया कशी घडली याविषयी अधिक माहिती पूर्ण क्रियाव्याप्तीच्या क्रियापदाद्वारे दिली जाते. यालाच सीमालक्ष्यी क्रियाव्याप्तीविधा असे म्हटले जाते.

**अंतर्गत मर्यादा : Internal limit/pred'elnost'.** पूर्ण क्रियाव्याप्तीच्या क्रियापदाला अर्थाचे एक वेगळे परिमाण देणारे व्यवच्छेदक लक्षण म्हणजे अंतर्गत मर्यादा. ह्या अंतर्गत मर्यादेमुळे क्रिया ही अनंत काळ उलगडत राहणारी प्रक्रिया अथवा वरचेवर घडणारी घटना न राहता काळाच्या एका ठरावीक तुकड्यात घडणारी, पूर्णत्वाला पोचून त्यानंतर थांबणारी किंवा लोप पावणारी एकसंध घटना बनते. अर्थाच्या दृष्टीने कोणताही फरक नसणारी मराठीतील ही काही क्रियापदे पाहा : खाणे-खाऊन टाकणे; फेकणे-फेकून देणे; पाडणे-पाडून टाकणे. अर्थाच्या दृष्टीने कोणताही फरक नसणाऱ्या ह्या क्रियापदांमध्ये अंतर्गत मर्यादा नसणे अथवा असणे एवढाच फरक आहे.

'भाषा आणि जीवन' (दिवाळी २००९) मधील श्री० उमाकांत कामत यांचा 'मराठी क्रियापदाबाबत एक विचार' हा लेख वाचला. मराठी भाषेतील बहुपदी क्रियापदे, त्यांची रूपे (विशेषत: आख्याताची रूपे) यांबाबत विचार करताना रशियन व इतर स्लावोनिक भाषेत प्रचलित असणाऱ्या 'क्रियाव्याप्ती' या व्याकरणिक कोटीचा आधार घेणे उपयुक्त ठरू शकेल असे वाटते.

१. 'क्रियाव्याप्ती' अथवा आस्पेक्ट ही संकल्पना सार्वत्रिक आहे, भाषेच्या सार्वत्रिक मूलतत्त्वांपैकी एक आहे, असे अनेक अभ्यासकांचे म्हणणे आहे. (उदा० कुरिलोविल्झ, येन्स होल्ट इत्यादी) क्रियाव्याप्तीची अभिव्यक्ती निरनिराळ्या भाषांमध्ये निरनिराळ्या तऱ्हेने होते याविषयी भाषाशास्त्रज्ञांचे एकमत आहे. काळ (टाइम) किंवा अभिवृत्ती (मूड) या कोटींपेक्षा क्रियाव्याप्ती वेगळी आहे. ही एक शब्दीय व्याकरणिक (लेक्सिको ग्रॅमॅटिक) कोटी आहे. रशियन व इतर स्लावोनिक भाषांतील पूर्ण व अपूर्ण क्रियाव्याप्ती (परफेक्टिव्ह व इंपरफेक्टिव्ह आस्पेक्ट) हा या कोटीचा उत्तम नमुना गणला जातो. या नमुन्यांसोबतच इतरही काही भाषांमधील (जसे ग्रीक: प्रेझेंट; एओरिस्ट व परफेक्ट; लॅटिन: इंपरफेक्टम व परफेक्टम हिस्टोरिकम इ०) क्रियाव्याप्तीचे नमुने तपासले असता क्रियाव्याप्ती या कोटीची काही सर्वसामान्य लक्षणे आपल्याला निश्चित करता येतात. ती अशी :

क्रियापदाची ठरावीक नमुन्याची विकरित रूपसारणी (व्हर्बल पॅराडाइम) हे व्याकरणिक लक्षण;

पूर्ण व अपूर्ण क्रियाव्याप्ती दर्शवणारी ठराविक रूपिमे (मॉरफीम्स) हे रूपीय (मॉरफॉलॉजिकल) लक्षण;

तर पूर्ण क्रियाव्याप्तीच्या क्रियापदांमध्ये शब्दिमांतून (लेक्सीम) व्यक्त होणारी

अंतर्गत मर्यादा व अपूर्ण क्रियापदाच्या शब्दिमांमध्ये असणारा या अंतर्गत मर्यादेचा अभाव हे शब्दीय लक्षण.

१.१ सामान्यत: क्रियाव्याप्तीचा व्याकरणिक आयाम क्रियापदांच्या विकरित रूपांच्या सारणीतून व्यक्त होत असतो. पूर्ण व अपूर्ण क्रियाव्याप्ती दर्शवण्यासाठी रशियन भाषेमध्ये रूपिमांचा वापर होतो. अपूर्ण क्रियाव्याप्तीदर्शक क्रियापदाला उपसर्ग (प्रिफिक्स) जोडून पूर्ण क्रियाव्याप्तीदर्शक क्रियापद तयार होते. पूर्ण व अपूर्ण क्रियाव्याप्तीच्या ह्या क्रियापदांची विकरित रूपसारणी ठरावीक प्रकारची असते. उपसर्ग क्रियापदाला शब्दीय पातळीवर एक अंतर्गत मर्यादासुद्धा घालत असतो.

१.२ वर उल्लेख केलेल्या तीन लक्षणांच्या आधारे आपण मराठीतील क्रियापदे, त्यांची आख्याते व त्याच्या विकरित रूपांच्या सारणी तपासल्या तर आपल्याला काय आढळते?

मराठीमध्ये पूर्ण, अपूर्ण व घटिष्य या तीन प्रकारच्या क्रियाव्याप्ती दिसतात. या तीन क्रियाव्याप्तींची तीनही काळांतील (वर्तमान, भूत व भविष्य) विकरित रूपे एका ठरावीक प्रकाराने बनतात. ज्याप्रमाणे रशियन भाषेमध्ये पूर्ण व अपूर्ण क्रियाव्याप्तीचा रूपीय निर्देशक (मॉरफॉलॉजिकल इंडिकेटर) उपसर्ग असतो त्याप्रमाणे मराठीत लाख्यात, ताख्यात व णार आख्यात अनुक्रमे पूर्ण, अपूर्ण व घटिष्य व्याप्तीचा निर्देश करतात. काळाची अभिव्यक्ती मात्र 'असणे' या साहाय्यक (ऑक्झिलरी) क्रियापदाद्वारे केली जाते.

१.३ क्रियाव्याप्ती व काल यांचा परस्पर संबंध व क्रियापदांच्या विकरित रूपांची ठराविकता यांचा बोध आपल्याला पुढील तक्त्यावरून होऊ शकतो.

तक्ता क्र० १

| काल \ क्रियाव्याप्ती | पूर्ण | अपूर्ण | घटिष्य |
|---|---|---|---|
| वर्तमान | तो गेला आहे | तो जात आहे | तो जाणार आहे |
| भूत | तो गेला होता | तो जात आहे | तो जाणार होता |
| भविष्य | तो गेला असेल | तो जात असेल | तो जाणार असेल |

तक्ता क्र० २

| भूतकाल | वर्तमानकाल | भविष्यकाल |
|---|---|---|
| तो गेला | तो जातो | तो जाईल |

तक्ता क्र० १ व क्र० २ यांमधील रचनांचा अभ्यास केला असता एक बाब

प्रकर्षाने लक्षात येते. एक पद असलेल्या क्रियापदांची कालदर्शक विकरित रूपे (पाहा तक्ता क्र० २) अभिव्यक्तीच्या दृष्टीने तुटपुंजी वाटतात. बहुपदी क्रियापदांची विकरित रूपे (पाहा तक्ता क्र० १) अधिक आशयसंपन्न असतात व काळाचे अधिक नेमके वर्णन करतात.

२. वस्तुनिष्ठ, व्यक्तिनिरपेक्ष आणि नैसर्गिक काळ हा एकरेषीय असतो. भाषेतला काळ मात्र पूर्णपणे व्यक्तिसापेक्ष असतो. एकरेषीय अजिबातच नसतो. वस्तुनिष्ठ, एकरेषीय काळात जगत असणारा भाषेद्वारे काही अभिव्यक्ती करताना एका सापेक्ष, एका तऱ्हेने पूर्णत: कल्पित काळाचे वर्णन करत असतो. भाषिक वर्णनांमध्ये येणारा काळ हा वर्णन करणाऱ्यांच्या दृष्टिकोनातून मागे-पुढे होत असतो. तो लवचीक असतो. वस्तुनिष्ठ, एकरेषीय काळाच्या दुसऱ्या एका बिंदूवर स्थित असणारा हे भाषिक वर्णन वाचत किंवा ऐकत असतो. वस्तुनिष्ठ काळ, बोलणाऱ्या किंवा लिहिणाऱ्यासाठी असणारा व्यक्तिसापेक्ष काळ आणि वाचणाऱ्या किंवा ऐकणाऱ्यासाठी असणारा व्यक्तिसापेक्ष काळ या तीन काळांमध्ये असणाऱ्या सुसंगतीच्या अभावामुळे भाषेमध्ये काळ ह्या कोटीच्या अभिव्यक्तीसाठी क्रियापदांचा विविध तऱ्हांनी वापर केलेला आढळतो. मराठीमध्ये बहुपदी क्रियापदांची योजना याच कारणास्तव होत असावी.

२.१ काळ किंवा क्रियाव्याप्तीच्या उपयोजनामध्ये काय सांगितले आहे (अर्थ), कशा प्रकारे सांगितले आहे (रूप) आणि का सांगितले आहे (कार्य) हे तीन प्रश्न अतिशय महत्त्वाचे ठरतात. एकपदीय क्रियापदाची रूपे जसे : गेला, जातो, जाईल ही वरील तीन प्रश्नांचा विचार करता अपुरी ठरतात. अनेक आधुनिक भारतीय भाषांमध्ये काळ व क्रियाव्याप्ती व्यक्त करण्यासाठी अशा प्रकारे बहुपदीय क्रियापदांची योजना केलेली आढळते. उदाहरणार्थ :

हिंदी : वह सो गया, ये तुम क्या कर रहे हो? न जाने कहाँ कहाँ से चले आते हैं; गुजराती : लखीवा लेओ; आवी जाओ;

काळाची अधिक नेमकी, अधिक सुस्पष्ट अभिव्यक्ती करण्यासाठी संस्कृतात बहुपदीय क्रियापदांची योजना केलेली आढळत नाही. आधुनिक भारतीय भाषांमध्ये मात्र एकपदीय क्रियापद व त्याच अर्थाचे बहुपदीय क्रियापद काळ आणि क्रियाव्याप्तीच्या नेमक्या अभिव्यक्तीसाठी वापरण्यात येते. आधुनिक भारतीय भाषांमध्ये ही प्रवृत्ती कुठून व कशी आली असावी हासुद्धा अभ्यासाचा विषय आहे.

३. मराठीत क्रियाव्याप्ती ही फक्त आख्यात रूपांतूनच व्यक्त होते असे नाही. तर 'ऊन कृदन्त' व दुय्यम क्रियापद अशा प्रकारची बहुपदीय रचनासुद्धा पूर्ण क्रियाव्याप्तीचा निर्देश करण्यासाठी वापरली जाते. आस्पेक्टॉलॉजी किंवा क्रियाव्याप्ती विचारामध्ये आक्सिओन्झार्टन किंवा सीमालक्ष्यी क्रियाव्याप्तिविधा महत्त्वाची भूमिका बजावते. सीमालक्ष्यी क्रियाव्याप्तिविधा ही क्रियेचे पूर्णत्व सूचित तर करतेच परंतु त्याचसोबत क्रिया कशा प्रकारे 'घडली' याविषयीसुद्धा अधिक माहिती देते. हा मुद्दा अधिक स्पष्ट करण्यासाठी पुढील तक्ता पाहू :

तक्ता क्र० ३

| एकपदीय क्रियापद | बहुपदीय क्रियापद |
|---|---|
| वाचणे | वाचून काढणे<br>वाचून टाकणे<br>वाचून संपवणे |
| खाणे | खाऊन टाकणे<br>खाऊन घेणे |
| सोडणे | सोडून देणे<br>सोडून जाणे |
| करणे | करून टाकणे<br>करून देणे<br>करून पाहणे |
| मरणे | मरून जाणे |
| झोपणे | झोपून जाणे<br>झोपून राहणे |

३.१ वरील तक्त्यामधील एकपदीय क्रियापदे अपूर्ण क्रियाव्याप्ती दर्शवतात तर बहुपदीय क्रियापदे पूर्ण क्रियाव्याप्ती व त्यासोबतच क्रियेसंबंधाने अधिक माहिती देतात. जसे :

**वाचणे** निव्वळ क्रियेचा निर्देश **वाचून काढणे** 'वाचणे' ह्या क्रियापदाने निर्देश होणाऱ्या क्रियेला एक अंतर्गत मर्यादा उत्पन्न होते. उदा० **त्याने पुस्तक वाचले : त्याने पुस्तक वाचून काढले.**





अनुक्रमणिका

| | | |
|---|---|---|
| | | **वाचून टाकणे** ‘वाचणे’ ह्या क्रियापदाने निर्देश होणाऱ्या क्रियेला एक अंगभूत मर्यादा उत्पन्न होते, तसेच क्रिया पुरेशा गांभीर्याने शेवटाकडे नेली जात नाही हा भाव ही सूचित होतो.<br>**वाचून संपवणे** ‘वाचणे’ ह्या क्रियापदाने निर्देश होणाऱ्या क्रियेला एक अंतर्गत मर्यादा उत्पन्न होते. तसेच क्रियेचा शेवट सूचित केला जातो. |
| **खाणे** | निव्वळ क्रियेचा निर्देश | **खाऊन टाकणे** ‘खाणे’ ह्या क्रियापदाने निर्देश होणाऱ्या क्रियेला एक अंतर्गत मर्यादा उत्पन्न होते. उदा० **वाघाने सशाला खाल्ले : वाघाने सशाला खाऊन टाकले.**<br>**खाऊन घेणे** ‘खाणे’ ह्या क्रियापदाने निर्देश होणाऱ्या क्रियेला एक अंतर्गत मर्यादा उत्पन्न होते. त्याखेरीज खाणे ही क्रिया कर्त्याच्या लाभासाठी घडल्याचे सूचित केले जाते. |
| **सोडणे** | निव्वळ क्रियेचा निर्देश | **सोडून देणे** ‘सोडणे’ ह्या क्रियापदाने निर्देश होणाऱ्या क्रियेला अंतर्गत मर्यादा उत्पन्न होते. उदा० **दारू पिणे सोडणे : दारू पिणे सोडून देणे**.<br>**सोडून जाणे** ‘सोडणे’ ह्या क्रियापदाने निर्देश होणाऱ्या क्रियेला अंतर्गत मर्यादा उत्पन्न होते. त्याखेरीज दूर होणे असाही अर्थ सूचित केला जातो. |
| **करणे** | निव्वळ क्रियेचा निर्देश | **करून टाकणे** ‘करणे’ ह्या क्रियापदाने निर्देश होणाऱ्या क्रियेला अंतर्गत मर्यादा उत्पन्न होते. उदा० **घरात आवराआवर करणे : घरात आवराआवर करून टाकणे**.<br>**करून देणे** ‘करणे’ ह्या क्रियापदाने निर्देश होणाऱ्या क्रियेला अंतर्गत मर्यादा उत्पन्न होते. तसेच क्रिया ही मूलतः दुसऱ्यासाठी केल्याचे सूचित होते. |



अनुक्रमणिका

| | | |
|---|---|---|
| | | **करून पाहणे** 'करणे' ह्या क्रियापदाने निर्देश होणाऱ्या क्रियेला अंतर्गत मर्यादा उत्पन्न होते. त्याखेरीज क्रिया पहिल्यांदाच घडत असल्याचे सूचित केले जाते. |
| **मरणे** | निव्वळ क्रियेचा निर्देश | **मरून जाणे** 'मरणे' ह्या क्रियापदाने निर्देश होणाऱ्या क्रियेला अंतर्गत मर्यादा उत्पन्न होते. उदा० **त्याचे आईवडील तो लहान असतानाच मेले : त्याचे आईवडील तो लहान असतानाच मरून गेले.** |
| **झोपणे** | निव्वळ क्रियेचा निर्देश | **झोपून जाणे** 'झोपणे' ह्या क्रियापदाने निर्देश होणाऱ्या क्रियेला अंतर्गत मर्यादा उत्पन्न होते. उदा० **नऊ वाजताच तो झोपला. नऊ वाजताच तो झोपून गेला.** |
| | | **झोपून राहणे** 'झोपणे' ह्या क्रियापदाने निर्देश होणाऱ्या क्रियेला अंतर्गत मर्यादा उत्पन्न होते. त्याखेरीज 'झोपणे' ह्या क्रियापदाने निर्देश केलेली स्थिती तशीच कायम असल्याचे सूचित केले जाते. |

३.१.१ वरील सर्व उदाहरणांमध्ये एक एकपदीय क्रियापद व त्याच्या ऊन कृदन्तापासून बनणारी अनेक बहुपदीय क्रियापदे यांमधून सीमालक्ष्यी क्रियाव्याप्तीविधा स्पष्ट होते. पैकी 'वाचणे'-'वाचून काढणे'; 'खाणे'-'खाऊन टाकणे'; 'सोडणे'-'सोडून देणे', 'करणे'-'करून टाकणे'; 'मरणे'-'मरून जाणे'; 'झोपणे'-'झोपून जाणे' ह्या जोड्यांमध्ये अर्थाच्या पातळीवर फारसा फरक आढळत नाही. बहुपदीय क्रियापद क्रियेला एक अंतर्गत मर्यादा प्राप्त करून देते. परंतु एकपदीय क्रियापद व त्याच्या ऊन कृदन्तापासून बनणारी इतर काही बहुपदीय क्रियापदे यांच्यामध्ये अंतर्गत मर्यादेव्यतिरिक्त काही इतरही अर्थच्छटा उत्पन्न झालेल्या दिसतात. जसे 'वाचणे'-'वाचून काढणे', 'वाचून संपवणे'; 'खाणे'-'खाऊन घेणे'; 'सोडणे'-'सोडून जाणे'; 'करणे'-'करून देणे' 'करून पाहणे'; 'झोपणे'-'झोपून राहणे' या जोड्या.

३.१.२ अशा प्रकारे पूर्ण क्रियाव्याप्तीखेरीज जास्तीच्या अर्थच्छटा व्यक्त करणाऱ्या क्रियापदांना आक्सिओन्झार्टन अथवा सीमालक्ष्यी क्रियाव्याप्तिविधा

असे संबोधले जाते. सीमालक्ष्यी क्रियाव्याप्तिविधा उद्‌भवण्याचे एक स्पष्टीकरण रशियन भाषेच्याबाबत दिले जाते ते असे : अगोदर उल्लेख केल्याप्रमाणे रशियन भाषेमध्ये पूर्ण क्रियाव्याप्ती क्रियापदाला उपसर्ग लागून बनते. रशियनमधील अनेक उपसर्ग हे प्रत्ययापासून Preposition बनलेले आहेत. भाषेच्या वाढीच्या एका टप्प्यावर उपसर्ग आणि प्रत्यय हे दोन्ही वापरले जात असत. कालांतराने प्रत्ययाचा अर्थ हळूहळू क्रियापदाच्या अर्थाची एकरूप होऊ लागला. जेव्हा प्रत्यय आणि क्रियापद यांच्या अर्थामध्ये फारशी भिन्नता नव्हती तेव्हा पूर्ण क्रियाव्याप्तिदर्शक क्रियापद बनले. मात्र जेव्हा प्रत्यय आणि क्रियापद यांच्या अर्थांमध्ये भिन्नता होती तेव्हा सीमालक्ष्यी क्रियाव्याप्तिविधादर्शक क्रियापद बनले.

३.१.३ मराठी भाषेच्या वाढीच्या इतिहासाशी माझा परिचय नाही. परंतु ऊन कृदन्त मराठीमध्ये संयुक्त वाक्य बनवण्यासाठी वापरले जाते. एकापाठोपाठ एक घडणाऱ्या दोन घटना ऊन कृदन्ताचा वापर करून एका वाक्यात एकत्र गुंफता येतात. उदा. : **तो जेवून बाहेर पडला** (तो जेवला आणि बाहेर पडला). मराठीतही कदाचित रशियन भाषेप्रमाणेच प्रक्रिया घडून आली असावी व दोन्ही क्रियापदांचे अर्थ एकरूप झाले असावेत. एकापाठोपाठ एक घडणाऱ्या दोन घटना दर्शवणारी परंतु जिच्यामध्ये दोन्ही क्रियापदांचे अर्थ एकमेकांत मिसळू लागल्याचे जाणवते अशी मराठीतील वाक्यरचना पाहा : **बाळा, हा लाडू खाऊन जा!** (लाडू खा आणि जा. यामध्ये जाणे ह्या क्रियापदाचा अर्थ **खाणे** ह्या क्रियापदाच्या तुलनेत थोडासा दुय्यम, थोडासा शबल झाल्यासारखा वाटतो.) आजच्या मराठी भाषेतील अनेक ऊन कृदन्त असणारी बहुपदीय क्रियापदे अशीही आहेत ज्यांमध्ये दुसऱ्या क्रियापदाच्या अर्थाचा पूर्ण लोप झालेला आढळतो. जसे **मारून टाकणे; खाऊन टाकणे; देऊन टाकणे; घेऊन टाकणे** ह्या बहुपदीय क्रियापदांमधील 'टाकणे' हे क्रियापद आपला स्वतंत्र अर्थ टिकवून ठेवताना दिसत नाही. अशा तऱ्हेने मराठी भाषेचा ऐतिहासिक आढावा घेऊन पूर्ण क्रियाव्याप्ती अथवा सीमालक्ष्यी क्रियाव्याप्तिविधा कशा प्रकारे व केव्हा मराठीत रुजली हे पाहणे मनोज्ञ ठरेल.

३.२ वर उल्लेख केल्याप्रमाणे अनेक आधुनिक भारतीय भाषांमध्ये पूर्ण क्रियाव्याप्ती व सीमालक्ष्यी क्रियाव्याप्तिविधा दर्शविण्यासाठी बहुपदी क्रियापदांचा वापर होतो. ह्या बहुपदी क्रियापदातील दुय्यम क्रियापद म्हणून काही ठरावीक क्रियापदांचा वापर होतो. प्रा० हेल्मुट नेस्पिताल यांनी हिंदी व उर्दू भाषेतील अशा तऱ्हेच्या दुय्यम क्रियापदांची संख्या निश्चित करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या अनुमानानुसार हिंदी, उर्दूतील अशा दुय्यम क्रियापदांची संख्या ४७ इतकी

आहे. अशा प्रकारचे सर्वेक्षण मराठीसंदर्भात कोणी केल्याचे ऐकिवात नाही. तरीसुद्धा मराठीतील काही क्रियापदे ही पूर्ण क्रियाव्याप्ती व सीमालक्ष्यी क्रियाव्याप्तिविधा दर्शवण्यासाठी दुय्यम क्रियापद म्हणून वरचेवर वापरली जातात. जसे :

**टाकणे :** मारून टाकणे; हरवून टाकणे; खाऊन टाकणे; देऊन टाकणे; घेऊन टाकणे; विकून टाकणे; लिहून टाकणे; वाटून टाकणे इत्यादी

**देणे :** सोडून देणे; फेकून देणे; टाकून देणे; आणून देणे; लिहून देणे; जमवून देणे; काढून देणे इत्यादी

**जाणे :** मरून जाणे; सोडून जाणे; पळून जाणे; झोपून जाणे; राहून जाणे; विसरून जाणे इत्यादी

**ठेवणे :** काढून ठेवणे; दाबून ठेवणे; मांडून ठेवणे; सांगून ठेवणे; घालून ठेवणे; लिहून ठेवणे; करून ठेवणे इत्यादी

**घेणे :** खाऊन घेणे; बांधून घेणे; लिहून घेणे; जोडून घेणे; ऐकून घेणे; बघून घेणे इत्यादी

३.२.१ वरील सर्व दुय्यम क्रियापदे क्रियेचे पूर्णत्व सूचित करतात. तसेच क्रिया कशा प्रकारे घडली याविषयीसुद्धा अधिक माहिती देतात. वरील सर्वच दुय्यम क्रियापदे जेव्हा बहुपदी क्रियापदाचा भाग बनतात तेव्हा त्यांच्या स्वतःच्या अर्थाचा लोप झालेला आपल्याला दिसतो. ऊन कृदन्ताच्या क्रियापदाचा अर्थ व दुय्यम क्रियापदाचा अर्थ यांमध्ये कितपत साम्य आहे, ते अर्थ एकमेकांच्या किती जवळ जाणारे, एकमेकांना किती पूरक आहेत यावर ते बहुपदी क्रियापद एकपदी क्रियापदाच्या पूर्ण क्रियाव्याप्तीचे रूप आहे की अधिक काही अर्थच्छटा व्यक्त करणारे सीमालक्ष्यी क्रियाव्याप्तिविधेचे रूप आहे हे ठरते. ढोबळ मानाने असे म्हणता येईल, की जितका दुय्यम क्रियापदाचा अर्थ ऊन कृदन्त क्रियापदाला पूरक तितके ते बहुपदी क्रियापद केवळ पूर्ण क्रियाव्याप्ती व्यक्त करण्याची शक्यता अधिक.

३.३ ऊन कृदन्ताच्या साहाय्याने बहुपदी क्रियापद बनताना अनेकवार असेही घडते, की दोन्ही क्रियापदांच्या अर्थाचा लोप होऊन एक नवेच बहुपदी क्रियापद तयार होते. अशा क्रियापदाचा संबंध ऊन कृदन्ताच्या क्रियापदाच्या अर्थाशी किंवा दुय्यम क्रियापदाच्या अर्थाशीही लावता येत नाही. जसे : पळवून लावणे; तुटून पडणे इत्यादी. ह्यामध्ये आपल्याला पळवणे; पळवून लावणे अशी जोडी लावता

येत नाही. पळवणे-पळवून नेणे ही मात्र अपूर्ण व पूर्ण क्रियाव्याप्तीदर्शक जोडी मानली जाऊ शकते. तीच गोष्ट तुटणे व तुटून पडणे यांबाबतही म्हणता येईल. तुटणे-तुटून जाणे ही मात्र अपूर्ण व पूर्ण क्रियाव्याप्तीदर्शक जोडी गणली जाऊ शकते. याचे कारण ऊन कृदन्ताच्या क्रियापदाच्या अर्थाला फक्त एक अंतर्गत मर्यादा घालण्याचे काम दुय्यम क्रियापद करताना दिसते. दुय्यम क्रियापदाच्या अर्थाचा बहुपदी क्रियापदामध्ये लोप झालेला दिसतो.

४. मराठीतील पूर्ण क्रियाव्याप्तिदर्शक बहुपदी क्रियापदे ही दोन शब्दिमांची बनलेली असतात. अर्थाच्या दृष्टीने ती एकसंध गणली गेली तरी लिहिताना दोन वेगळे शब्द म्हणूनच लिहिली जातात. त्यामुळेच अनेकदा बहुपदी क्रियापदाच्या मध्ये अव्यय घातले जाते. जसे : वाघोबा तू या सशाला खाऊनच टाक किंवा तू निदान त्याच्याशी बोलून तरी घे. रशियन भाषेमध्ये पूर्ण क्रियाव्याप्तीदर्शक क्रियापदे उपसर्ग लागून बनत असल्याकारणाने ती अधिक एकसंध असतात.

४.१ रशियन भाषेमधील पूर्ण क्रियाव्याप्तीचे क्रियापद विकरित रूप सारणीप्रमाणे चालवल्यास भविष्यकाळाचा निर्देश करते. थोडक्यात रशियन भाषेमधील पूर्ण क्रियाव्याप्तीचे क्रियापद केवळ भूतकाळ किंवा भविष्यकाळ दर्शवू शकते. मराठीतील बहुपदीय क्रियापदांची योजना मात्र तिन्ही काळ दर्शवण्यासाठी केली जाऊ शकते. जसे :

तक्ता क्र० ४

| भूतकाळ | वर्तमानकाळ | भविष्यकाळ |
|---|---|---|
| तो मरून गेला | तो मरून जातो | तो मरून जाईल |
| ती झोपून गेली | ती झोपून जाते | ती झोपून जाईल |
| त्याने आंबा खाऊन टाकला | तो आंबा खाऊन टाकतो | तो आंबा खाऊन टाकेल |

४.२ वरील तक्ता पाहताना एक गोष्ट प्रकर्षाने लक्षात येते, ती अशी : बहुपदीय क्रियापदाची वर्तमानकाळात केलेली योजना अभावानेच आढळते. अशा तऱ्हेच्या बहुपदीय क्रियापदांच्या वर्तमानकाळातील रचना narrative textमध्ये किंवा नाटकांच्या लिखित संहितांमध्ये असणाऱ्या सूचनांमध्ये वापरल्या जातात. याचे कारण असे, की ऊन कृदन्त व दुय्यम क्रियापद बहुपदी क्रियापदाला एक पूर्णत्व प्रदान करतात. त्यामुळे ती क्रिया शेवटपर्यंत गेली आहे असे सूचित होते. तिला एक प्रकारचे पूर्णत्व, एक प्रकारची अखंडितता प्राप्त होते. याउलट एकपदीय

क्रियापद नुसतेच क्रियेचे नामकरण करतात. ती क्रिया पूर्ण आहे अथवा नाही, ती शेवटापर्यंत गेली की नाही याचे कोणतेच सूचन एकपदीय क्रियापदात नसते. त्यामुळे काळामध्ये उलगडत जाणारी क्रिया किंवा वारंवार घडणारी क्रिया (habitual action) दर्शविण्यासाठी एकपदीय क्रियापदांचा उपयोग होतो.

५. रशियन भाषेचा अभ्यास केल्यानंतर क्रियाव्याप्ती ह्या व्याकरणिक कोटीची मला नव्याने जाणीव झाली. तत्पूर्वी मराठी भाषेच्या व्याकरणात माझा तिच्याशी तितकासा परिचय झाला नव्हता. प्रस्तुत लेखात रशियन भाषेशी तुलना करून ही कोटी अधिक स्पष्ट करण्याचा प्रयास केला आहे. लेखात सुरुवातीलाच दिलेली तीन लक्षणे वापरून मराठीतील पूर्ण व अपूर्ण क्रियाव्याप्ती स्वतंत्रपणे अभ्यासणे शक्य आहे, नव्हे तसे करणे गरजेचेही आहे. कारण मराठीतील क्रियापदांचा म्हणावा तितका अभ्यास झालेला नाही. स्थलमर्यादेमुळे प्रस्तुत लेखात मराठीतील चल क्रियापदे (verbs of motion) (जसे येणे; जाणे; नेणे; आणणे इत्यादी) विचारात घेतलेली नाहीत. त्याविषयी पुन्हा कधीतरी.

**संदर्भ :**

१. **इंदापूरकर** चं०द० 'मराठी भाषा व्यवस्था आणि अध्यापन' पुणे १९८९

२. **निफ्येयेव** एम०वे० 'सिमांतिचिस्काया इवाल्यूत्सिया ग्लागोल्निख प्रिस्तावक ना इ अब व इस्तोरी रूस्कावा यिझिका XI-XIII वेकोव' वप्रोसी यिझिकाइनानिया क्र० ४, १९९४ (ना व अब या क्रियापदीय उपसर्गांच्या अर्थाची रशियन भाषेच्या इतिहासातील उत्क्रांती ११ ते १८ वे शतक)

३. **नेस्पिताल** हेल्मुट Verbal Aspect in Indo-Aryan and Dravidian Languages, the relation of simple verbs to verbal expressions (compound verbs). In the journal "Berliner Indologisches Studien, Berlin," vol. 9/10 1996.

४. **नेस्पिताल** हेल्मुट The Use of non-perfective simple verbs and perfective verbal expressions (compound verbs) in new Indo-Aryan languages - grammatical, lexical and pragmatic criteria for their selection, Nanavidhaikata, Festschrift fur Herman Berger, 1996.

५. **भट** अनघा Aspect in Marathi and Russian : An Attempt at Contrastive Analysis, Russian Language Literature and

Society - a post perestroika overview, ed. Vinay Totawar, Neeraja Jaiswal CIEFL, Hyderabad, 2005.

६. **मास्लव** यु०स० संपादित ‘वप्रोसी ग्लगोल्नवा वीदा’ मॉस्को, १९६२ (क्रियापदांच्या व्याप्तीच्या समस्या)

७. **झोलातवा** गे०आ० ‘कातेगोरी व्रेमेनी इ वीदा स्तोच्की झेनिया त्येक्स्ता’ वप्रोसी यिझिकाझ्नानिया क्र० ३, २००२ (संहितेच्या अंगाने काळ व क्रियाव्याप्ती ह्या कोटी)



3, बसंत बहार अपार्टमेंट्स, 119/बी प्रभात रस्ता, पुणे 411 004.
दूरभाष : (020) 2544 9476, भ्रमणभाष : 098226 11969
ई-पत्ता : anaghab2@rediffmail.com

**संदर्भ कसे द्यावेत?**

संदर्भ देण्याची नवी, सोयीस्कर व जागेचा अपव्यय टाळणारी पद्धत पुढे दिली आहे. या पद्धतीचाच लेखकांनी आपल्या लेखांत उपयोग करावा.: लेखात ज्या ठिकाणी संदर्भ द्यावयाचा असेल तेथे कंसामध्ये संबंधित पुस्तक-लेखकाचे नाव द्यावे आणि त्यापुढे संदर्भित पुस्तक / लेखाचे प्रकाशनवर्ष द्यावे. त्यानंतर, आवश्यक असल्यास, स्वल्पविराम देऊन पृष्ठक्रमांक लिहावा व कंस पुरा करावा. लिखाणाच्या अखेरीस ‘संदर्भसूची’मध्ये संदर्भातील सर्व तपशील द्यावेत. सूचीतील प्रत्येक नोंदीतील तपशिलांचा क्रम साधारणपणे असा ठेवावा : लेखकाचे आडनाव, स्वल्पविराम, नावांची आद्याक्षरे, प्रकाशनवर्ष, ग्रंथांचे शीर्षक, पूर्णविराम, प्रकाशनसंस्था, स्वल्पविराम, प्रकाशनस्थळ, पूर्णविराम. संदर्भसूची मराठीच्या वर्णक्रमानुसार असावी.

# पुढादीगणातील शब्द

सुशांत शंकर देवळेकर

पुढे, मागे, वर, खाली, इकडे, तिकडे इ० शब्दांना मराठीच्या बहुतेक व्याकरणकारांनी आणि कोशकारांनी क्रियाविशेषण ह्या गटात घातलेले आढळते पुढील, पुढचा, पुढला इ० शब्दरूपे ही अर्थातच विशेषण ह्या गटात जातात. अशीच आणखीही काही शब्दरूपे आहेत. ह्या शब्दरूपांचे बारकाईने निरीक्षण केले तर असे आढळते की ह्या शब्दांचा एक सबंध गट आहे आणि ह्या शब्दरूपांची आणखी फोड करायला वाव आहे.

मराठी नामिकांची[१] म्हणजेच सलिंगसवचन शब्दांची घराचा, बागेभोवती अशी रूपे पाहिली (सलिंग शब्दांनाच वचनाचा विकार होतो) तर त्यांची रचना [(सलिंग शब्द + (विकरण) + उत्तरयोगी (प्रत्यय/शब्दयोगी)] अशी आढळते. ह्यांपैकी काही प्रत्यय आणि शब्दयोगी हे सलिंग नसणाऱ्या पुढ्सारख्या शब्दांनाही लागलेले आढळतात. उदा० पुढपर्यंत, पुढवर, पुढे, पुढून इ. उदाहरणांत पर्यंत, वर, ए, ऊन हे प्रत्यय / उत्तरयोगी पुढ्सारख्या शब्दांना लागलेले आहेत. घरापासून, शाळेपाशी ह्यांतील पासून, पाशी असे काही शब्दयोगी हे मुळात ह्याच गटातल्या शब्दांपासून बनलेले दिसतात. उदा० पास् = > पासून, पाशी, पासचा इ०

## पुढादीगणातील शब्दांची वैशिष्ट्ये

ह्या शब्दांचा एक गट करून ह्या शब्दांना 'पुढादीगणातले शब्द' असे नाव देता येईल. ह्या गणातील शब्दांची काही वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे सांगता येतील.

१. **हे शब्द अलिंग असतात.** आपल्याला असे विधान करता येणे शक्य आहे कारण एरवी एखाद्या शब्दाचे लिंग कळण्यासाठी तो शब्द आणि क्रियापदाशी आणि अन्य पदांशी त्याच्या रूपाची जुळणी ह्यावरून आपल्याला लिंगाची जाणीव होते. उदा० काळा घोडा, पांढरी गाय, घोडा पळाला, गाय चरते. अशा रूपाला प्रथमेचे रूप किंवा सरळ रूप असे म्हणतात. पण ह्या पुढादीगणातल्या शब्दांची रूपे अशी थेट प्रथमेतील नसतात. त्यांची प्रथमेतली रूपे अन्य घटक (शब्दसिद्धीचा सलिंग प्रत्यय उदा० आ > पुढ् + आ = पुढा) मध्ये येऊन तयार होतात.

२. **हे शब्द स्थान वा दिशा ह्यांचे वाचक असतात.** पुढे इ० शब्दांची पुढ् + ए अशी फोड होते. ह्यातील ए हा प्रत्यय अधिकरणार्थी आहे आणि त्याचा अर्थ विशिष्ट

ठिकाणी असा होतो. हा प्रत्यय ज्या शब्दाला लागतो तो प्रत्ययाआधीचा पुढ् हा शब्द ते विशिष्ट स्थान वा दिशा कोणती आहे ते सांगतो.

३. ह्यांना वेगवेगळे प्रत्यय लागून नामिके आणि अव्यये तयार होतात. उदा० खाली, खालचा, वरले, मागची.

४. ह्यांपैकी काही रूपे नामिक शब्दांच्या पुढे (सामान्य रूपांपुढे) येतात. त्यांना अशा वेळी शब्दयोगी ह्या गटात घालता येते. उदा० दारासमोरून, वाड्यापुढे इ०




**पुढादीगणातील सिद्ध आणि साधित शब्द**

पुढगणातील शब्दांचे सिद्ध आणि साधित असे दोन वर्ग करता येतात.

१. सिद्ध शब्द : ह्या शब्दांची आणखी अवयवांत फोड होत नाही. ह्या गणात पुढील शब्द आढळतात.

अ) **पुढ्, माग्, कड्** : पुढे, मागे, कडे

आ) **खाल्, पाठ्** : खाली, पाठी

इ) **वर्, बाहेर्, समोर्, लांब्, जवळ्, आत्, आड्** :

२. साधित शब्द : ह्या शब्दांची, अवयव वेगळे करीत, अजून फोड करता येते.

अ) **जतकहची रूपे** : एरवी सर्वनामांची आणि सार्वनामिक विशेषणे म्हणवणाऱ्या शब्दरूपांपैकी काही रूपेही ह्या गटात घालता येतात. ह्या शब्दरूपांतही एक आकृतिबंध आढळतो. ह्या शब्दरूपांच्या आरंभी ज्, त्, क्, ह् हे विशिष्ट दिशावाचक / निर्देशी अवयव आढळतात. म्हणून ह्या रूपांना जतकहची[१] रूपे म्हटले आहे.

क) **ज्** : पूर्वनिर्देशी वा उद्देशवाचक : उदा० **जेथे** जातो **तेथे** तू माझा सांगाती

ख) **त्** : उत्तरनिर्देशी वा दूरत्वनिर्देशी : **तिथून** पाणी आणावे लागेल.

ग) **क्** : प्रश्ननिर्देशी : ही बस **कुठपर्यंत** जाणार आहे?

घ) **ह्** : समस्थानकालनिर्देशी : **इथला** माल जगभर विकला जातो.

जिथ्, जेथ्, तिथ्, तेथ्, इथ्, येथ्, (एथ्), कुठ्, कोठ् ह्या शब्दरूपांना पुढ् इ० प्रमाणेच प्रत्यय लागून रूपे बनतात.

| | |
|---|---|
| ज् + एथ् = जेथ् : | जेथे, जेथून, जेथील |
| त् + एथ् = तेथ् : | तेथे, तेथून, तेथील |
| क् + ओठ् = कोठ् : | कोठे, कोठून, कोठील |
| ह्` + एथ् = येथ् : | येथे, येथून, येथील |

आ) **कड्ची रूपे :** कड् ह्या पुढगणातील शब्दाच्या आधी काही घटक येऊन ही रूपे तयार होतात. उदा० इकड्, तिकड्, सगळीकड् इ० ह्यांना मग अधिकरणाचे इ० प्रत्यय / उत्तरयोगी लागून इकडे, तिकडे, सगळीकडून अशी रूपे तयार होतात. ह्यात कडच्या आधी काहीएक घटक आलेलाच असतो. निव्वळ कडे, कडून असा प्रयोग आढळत नाही. जतकह हे वर उल्लेखलेले अवयवही कड्च्या आधी येतात आणि ज + इ + कड् > जिकड्, तिकड्, इकड्, कुणीकड् अशी रूपे घडतात.

काही सलिंग विशेषणांच्या (शेवटी स्वर असल्यास) शेवटच्या स्वराला ईचा आदेश होऊन आणि ती व्यंजनान्त असल्यास त्यांना ई लागून त्यापुढे कड् येऊन काही रूपे बनतात. ही रूपे क्रियेचे स्थान दाखवतात. उदा०

| | |
|---|---|
| सगळा > सगळी + कड् = सगळीकड् | तिसरा > तिसरी + कड् = तिसरीकड् |
| वेगळा > वेगळी + कड् = वेगळीकड् | सारा > सारी + कड् = सारीकड् |
| डावा > डावी + कड् = डावीकड् | (ऐल्) > अली + कड् = अलीकड् |
| उजवा > उजवी + कड् = उजवीकड् | (पैल्) > पली + कड् = पलीकड् |
| भलता > भलती + कड् = भलतीकड् | एक > एकी + कड् = एकीकड् |
| दुसरा > दुसरी + कड् = दुसरीकड् | |

इ) **पास्ची रूपे :** पास् ह्या शब्दाला ई लागताना शेवटच्या सकाराचा शकार होतो आणि पाशी असे रूप तयार होते. तसेच ह्या शब्दाला ऊन लागून पासून असा शब्द तयार होतो. हे शब्द पहिल्या गटातल्या शब्दाच्या पुढे येतात. आणि पुढपासून, जिथपासून अशी रूपे तयार होतात.

**लागणारे प्रत्यय**

पुढगणातील वर सांगितलेल्या शब्दरूपांपासून काही अधिकरण हा कारक संबंध असलेली रूपे बनतात तर काही विशेषणे वा कर्तृपदेही तयार होतात.

**ए/ई** : हे दोन्ही अधिकरणार्थी प्रत्यय आहेत. ह्या प्रत्ययांचा अर्थ ही क्रिया अमुक स्थानी घडली असे दाखवतो. 'मी घरी आलो' ह्यात येण्याची क्रिया 'घर' ह्या स्थानावर झाली असा अर्थ व्यक्त होतो.

खाल्, पाठ् ह्या शब्दांना ई हा प्रत्यय वरील अर्थानेच लागतो आणि खाली, पाठ् अशी शब्दरूपे घडतात.

वर, समोर, बाहेर्, आत् ह्या शब्दांत ई ह्या प्रत्ययाचा लोप होतो (आत् ह्या शब्दाचा अपवाद वगळता वरी, समोरी, बाहेरी अशी रूपे जुन्या ग्रंथांत आढळतात.)

**ऊन** : हा प्रत्यय अपादानार्थी आहे. तो पुढगणातल्या शब्दांना थेट लागतो. उदा० पुढून, मागून, वरून, खालून, आतून, बाहेरून, आडून, इकडून, तिकडून, जिकडून, कुठून, कोठून, डावीकडून, उजवीकडून, सगळीकडून, वेगळीकडून, भलतीकडून, एकीकडून, दुसरीकडून, तिसरीकडून, सारीकडून, पलीकडून, अलीकडून.

पास् ह्या शब्दाला ऊन लागून 'पासून' असे रूप बनते. ते केवळ उत्तरयोगी म्हणूनच वापरतात आणि ते काही पुढगणांतल्या शब्दांनाही लागते. पुढपासून, मागपासून, वरपासून, खालपासून, इथपासून, तिथपासून, जिथपासून, कुठपासून, आतपासून, बाहेरपासून, घरापासून इ०

**नाम, धातू इ० शब्दांची निर्मिती**

पुढादीगणातील शब्दांपासून काही धातू तसेच काही सलिंग शब्दही तयार होताना दिसतात. पण ही प्रक्रिया घडताना ती आधी उल्लेखिलेल्या रूपांइतकी सार्वत्रिक नाही असे दिसते.

**सलिंग प्रत्ययाचा लोप होऊन तयार होणारे सलिंग शब्द**

माग (पू) : ह्या शब्दाचा अर्थ मागे राहून हुडकून काढण्याची क्रिया असा होतो.

पाठ (स्त्री) : शरीराच्या मागचा अवयव

**साधित धातू**

१. पुढार् (पुढ् + आर्) : पुढे होण्याची क्रिया. ह्यापासून पुढारतो इ० धातुरूपे तसेच पुढारलेला, पुढारणे, पुढारी, पुढारपण इ० धातुसाधित नामिके घडतात. तसेच पुढे असण्याची क्रिया म्हणजे पुढाकार (पु), पुढली बाजू म्हणजे पुढा (पु) हे शब्दही घडलेले आढळतात.

२. मागास् (माग् + आस्) : मागे पडणे, मागासले, मागासलेला, मागासणे इ०

३. खालाव् (खाल् + आव्) : खाली येणे (लक्षणेने : गुणवत्ता घसरणे). खालावते, खालावलेले.

## संदर्भसूची


अर्जुनवाडकर, कृष्ण श्रीनिवास. १९८७. मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद; सुलेखा प्रकाशन, पुणे.

दामले, मोरो केशव. १९७०. शास्त्रीय मराठी व्याकरण; (संपा. कृष्ण श्री. अर्जुनवाडकर), देशमुख आणि कंपनी; पुणे

धोंगडे, रमेश वामन. १९८३. अर्वाचीन मराठी : काँटिनेंटल प्रकाशन, पुणे


■


ई-पत्ता : sushant.devlekar@gmail.com

भ्रमणभाष : 097698 35310


------------

**टिपा :**

१) 'नामिक' ही संज्ञा कृ०श्री० अर्जुनवाडकर ह्यांनी वापरली आहे. लिंग आणि वचनाचा विकार होणाऱ्या, तसेच धातू आणि अव्यये ह्यांपासून वेगळ्या अशा शब्दांसाठी त्यांनी ही संज्ञा वापरली आहे.

२) जतकहची इतर रूपे : जो, जेव्हा, जिथला, जिथे, जेथे, जितका, जेवढा, जितपत, जोवर, जसा, जितवा, तो, तेव्हा, तिथला, तिथे, तेथे, तितका, तेवढा, तितपत, तोवर, तसा, हा, एव्हा, इथला, इथे, येथे, इतका, एवढा, इतपत, असा, कोण, केव्हा, कुठला, कुठे, कोठे, कितका, केवढा, कितपत, कसा, कितवा.

३) इथे आकाराव्यतिरिक्तचा स्वर पुढे आल्यास हकाराचा लोप होतो. तसेच ए ह्या स्वराआधी य् हा वर्ण येऊन ये असे अक्षर येते. लेखनात ही यकारयुक्त रूपेच वापरतात. उदा० येथे, येथला, येथचा इ०

### मेंदू हीच भूमी

कुठलंही रोपटं कुठेही नेऊन लावलं म्हणजे ते मूळ धरू शकत नाही. तसेच कुठलीही भाषा कुठेही नेऊन रुजवली, तरी ती तेथे मूळ धरू शकत नाही. प्रत्येक भाषेची एक भूमी असते आणि ही भूमी माणसाच्या मेंदूत असते. हा मेंदू लाखो वर्षांच्या संस्कारांनी घडलेला असतो. कोणतीही भाषा लौकिकदृष्ट्या कितीही मागे पडलेली असो, ती बोलणाऱ्याची वाढ त्याच भाषेत योग्य प्रकारे होते.

*रवींद्र केळेकर,*

*दै० लोकसत्ता, दि० ६ डिसेंबर २००९*

# धुळे जिल्ह्यातील दलित स्त्रियांच्या ओवीगीतांतील माय-बाप

**प्रकाश भामरे**

मायबाप किंवा आईवडिलांचे स्थान प्रत्येक समाजात अनन्यसाधारण असते. आईच्या प्रेमाला तर जगात तोड नाही. मराठी साहित्यातील 'आई'विषयीच्या कविता सर्वपरिचित आहेत. 'मायबाप'विषयी कृतज्ञताभाव, प्रेमभाव व्यक्त करणाऱ्या ओव्या धुळे जिल्ह्यातील दलित समाजाच्या म्हणजेच पूर्वाश्रमीच्या महार जातीतील स्त्रिया अगदी सहज गाताना आढळतात. आजच्या धावपळीच्या युगातही दलित समाजातील सासुरवाशी मुलींचे 'माहेर'-आकर्षण कमी झालेले नाही. माहेरचे आकर्षण अर्थातच आईवडिलांच्या वात्सल्यामुळे निर्माण झालेले असते. ज्या मुलींना 'मायबाप' नाहीत, त्या मुलींचे जीवन म्हणजे वृक्षछाया नसलेल्या वाळवंटातील वाटेसारखे असते. ज्यांनी आपल्याला जग दाखविले, त्यांच्याविषयीचा कृतज्ञताभाव दलित स्त्रियांच्या ओव्यांतून ओतप्रोत भरलेला आढळतो. 'स्वामी तिन्ही जगांचा आईविना भिकारी', 'आधीच नव्हते काही, आता आईदेखील नाही' या काव्यपंक्तीतील भाव आईविषयीचा जिव्हाळा व्यक्त करतो.

महारी अहिराणी बोलीत बापासाठी 'आयबा' हा शब्द रूढ आहे. किंवा नुसता 'बा' हा शब्दही वापरात आहे. आय > आई + बा = आईबा > आयबा अशी या शब्दाची व्युत्पत्ती आहे. या शब्दाच्या संदर्भात अहिराणी संस्कृतीचे व भाषेचे अभ्यासक श्री० कृष्णा पाटील लिहितात, ''दोघांच्या मायेचा जिथे संगम आहे, मायेची पखरण, कर्तव्य यांचे ज्या विशिष्ट अवस्थेत मिलन होते; ती जगण्याची जिद्द असलेले व्यक्तिमत्त्व म्हणजे 'आईबा' होय.'' बापाच्या अनाकलनीय नात्याबद्दल जेवढे आजवर लिहिले गेले, ते थोडेच आहे. 'मायनी मया व्हटमा नि बापनी मया पोटमा' अशी एक म्हण महार जातीच्या अहिराणीत प्रचलित आहे. (आईची माया ओठात आणि वडिलांची माया पोटात) आईची माया जगाला दिसते परंतु वडिलांचे प्रेम किंवा माया पोटात म्हणजे मनात असल्यामुळे जगाला दिसत नाही. म्हणून बापाकडे पाहण्याचा दृष्टिकोन वेगळाच आढळतो.

मानवी जीवनातील वाढत्या विज्ञान-तंत्रज्ञानामुळे ग्रामीण संस्कृतीकडे,

बोलींकडे त्यात पुन्हा दलितांच्या बोलींकडे पाहण्याच्या द्वेषमूलक वृत्तीमुळे, घरोघरीचे 'घटे' (जाते) बंद पडल्यामुळे ओवीगीते दुर्मिळ होत चालली आहेत. निरक्षर दलित स्त्रियांनी गाईलेल्या या ओवीगीतांमधून प्रत्येक नात्यातले मानसशास्त्र प्रभावीपणे व्यक्त होते; व त्यातून त्या नातेसंबंधाविषयीचे आकलन अगदी सोप्या भाषेत होताना आढळते.

धुळे जिल्ह्यातील दलित समाजात पितृसत्ताक कुटुंबपद्धती प्रचलित आहे. कुटुंबाचा प्रमुख म्हणून बापाकडे पाहिले जाते. 'बाप' हा वरून कठोर वाटत असला तरी त्याच्या मनात अपत्यांविषयी विशेषतः 'मुलगी' अपत्याविषयी आत्यंतिक प्रेम, जिव्हाळा असतो. त्याला आपले अंतर्मन समाजापुढे उलगडून दाखविता येत नाही; जे आईला अगदी सहज जमते. मुलगी सासरी जाते तेव्हा 'आईवडिलांना तिची काळजी सतावत राहते. तिने यशस्वीपणे संसार करून आपले नाव काढावे, त्यासाठी सासरी चांगले वागावे, आईवडिलांच्या प्रतिष्ठेला, इज्जतीला ठेच पोहचणार नाही, असे तिचे वर्तन असावे. यासाठी बाप तिला शहाणपणाच्या दोन गोष्टी सांगतो, स्त्रीच्या चारित्र्याचा लोकमंत्रच जणू या ओव्यांतील बाप आपल्या मुलीला सांगत आहे.

''बाप कसा म्हने, लेकी चांगली ऱ्हायजो,
पाठ-पोट झाकीसनी, पानी नदीनं वायजो''

''बाप कसा म्हने, लेकी समाय मन्ही बानी,
वाया नको जाऊ देऊ, मन्ही पगडीनं पानी''

''बाप कसा म्हने, लेकी नांदीसनी काढ नाव,
तुन्हा शीवना सेजार, सगा-शाईसनं गाव''

''बाप कसा म्हने, लेकी जलमनी कटकट
शेवाया दगोड, पाय ठेवजो बयकट.''

बाप आपल्या मुलीला सांगतो चांगला संसार करून आपल्या घराचे नाव काढ, माझ्या 'पगडीचे पाणी' म्हणजे माझी इज्जत, प्रतिष्ठा यांची लाज राख. कारण तरुण मुलीचे जगणे म्हणजे शेवाळलेल्या दगडांवर पाय ठेवून वाट काढत चालणे होय. थोडे जरी वाकडे पाऊल पडले तरी आत्मघात होण्याचा संभव असतो. तिच्या पाय घसरण्याने तिचे व तिच्याबरोबर कुटुंबाचे जीवन उद्ध्वस्त होते. 'पाठ-पोट झाकीसनी' हा पदबंध म्हणजे शीलसंरक्षणाचा कानमंत्रच आहे. बापाच्या मनातील आंदोलने प्रस्तुत ओव्यांमधून सुरेख टिपलेली आहेत. कारण

सासुरवाशी मुलींच्या नैतिक-अनैतिक आचरणाचा थेट संबंध बापाच्या प्रतिष्ठेशी येतो. 'पगडीनं पानी' म्हणजे बापाची इज्जत होय. म्हणून आपले आपण सांभाळून राहण्याचा सल्ला बाप आपल्या मुलीला देत आहे.

''बाप कसा म्हने लेकी मोड येयेल सोनं
जीव लाई समाये शेवट पराईनं धन.''

आईवडिलांच्या दृष्टीने मुलगी हे परक्याचे धन असते. हा आशय व्यक्त करण्यासाठी 'लेकी मोड येयेल सोनं' हा पदबंध समर्पक आहे. गरिबीच्या संसारात सोने कितीही जीव लावून सांभाळले तरी शेवटी मोडावेच लागते. तसे मुलीला कितीही लाड-कोडाने वाढविले तरी तिला एक दिवस आईवडिलांचे घर सोडून दुसऱ्या घरी जावेच लागते. ही 'जनरीती' प्रस्तुत ओवी अधोरेखित करते.

''माय कशी म्हने, लेकी तांदुयनी कनी,
नऊ मयना वझं वागं, शेवट व्हयनी पराईनी''

प्रस्तुत ओवीचा आशयही उपरोक्त ओवीप्रमाणेच आहे. खळ्यात तांदळाची कनेरी जशी मोल म्हणून दुसऱ्याला द्यावी लागते. तसेच मुलीच्या बाबतीत घडते. लोकपरंपरेत काही गोष्टी दु:ख निर्माण करणाऱ्या असल्या तरी समाज-स्वास्थ्यासाठी त्यांचा स्वीकार आपल्याला करावाच लागतो.

मानसशास्त्रीय दृष्टीने विचार केला तर बापाचा जीव मुलगा या अपत्यापेक्षा मुलगी या अपत्यामध्ये अधिक असतो. हे मानसशास्त्रीय वास्तव पुढील ओव्या अधिक ठळक करताना आढळतात. मुलीची आई म्हणते -

''लाडनी वं पोर, तुन्हा लाड बजारमा
साकर-फुटाना सदा, तुन्हा बापना खिसामा''

''लाडनी वं पोर, नाव सीता-गीता
मारे तुले हाका, कवतुक्या तुन्हा पिता''

''लाडनी वं पोर, 'बा' ना ताटमा नको जेवू
पराई घर जानं तुले, जास्त मया नको लावू''

बापाचे आपल्या लाडक्या मुलीवर किती आत्यंतिक प्रेम असते; याचे दर्शन प्रस्तुत ओव्यांमधून घडते. मुलीचे लाड पुरविण्यासाठी खिशात साखर-फुटाणे ठेवणे, सतत तिला लाडाने सीता-गीता म्हणून हाका मारत राहणे, बापाच्या ताटात जेवणे या गोष्टी मुलगी आणि बाप यांच्या आंतरिक जिव्हाळा प्रकट करतात.

''बापनं वं जोडं, आंडोरना ऊनं पाये
जीवनी व्हयनी माटी, बापले नाय कये''

प्रस्तुत ओवी मुलगा या अपत्याविषयीचे वेगळेच सत्य आपल्यासमोर मांडते. बापाचे बूट (जोडा) मुलाच्या पायात यायला लागणे म्हणजे मुलगा तरुण होणे. त्या वेळी शहाणा बाप त्याच्या लग्नासंबंधी विचार करायला लागतो. परंतु प्रस्तुत ओवीतील बापाला हे कळलेले नाही. 'जीवनी व्हयनी माटी' म्हणजे मुलगा तरुण झाल्यावर त्याने लग्न केलेच पाहिजे. नाहीतर संबंधित मुलगा मनोविकृतीत अडकू शकतो. मुलाचे तारुण्य मातीमोल होण्याआधी त्याचे लग्न करणे आवश्यक आहे. योग्य वयात लग्न करणे हा संकेत ग्रामीण दलित कुटुंबात आजही गांभीर्याने पाळला जातो. अर्थार्जनाचा संबंध लग्नाशी जोडणाऱ्या आजच्या काळात मुलामुलींचे विवाह तिशी-पस्तीशीनंतर होतात, याचा अर्थ त्यांचे तारुण्य जळून जाते. त्यावर 'जीवनी व्हयनी माटी' हा शब्दबंध भाष्य करतो.

बापांसबंधी ओव्यांप्रमाणे 'माय'संबंधी ओव्याही दलित स्त्रिया गाताना आढळतात. मातेच्या प्रेमाची सर दुसऱ्या कोणत्याही गोष्टीला येणार नाही अशा या आईचे मोठेपण वर्णन करताना एक दलित स्त्री म्हणते -

''माय माय करू, माय साकरनं पोतं
मायनं नाव निंघता, हिरदे बये ज्योतं''

''माय माय करू, माय सोनानी पालखी
माय बिगर लेकीनी, नही कोठे आलोखी''

''माय माय करू, माय नदीमानी शाऊ
मायना पोटे ऊनुत, सात बहिनी एक भाऊ''

''माय माय करू, माय दुदनी मलाई
पाये मुडे काटा, जीव मायले बलाई''

''माय माय करू, माय पिठी वं साकर
माय दिसाबिगर, गोड लागेना भाकर''

उपरोक्त ओव्यांमधून आईची थोरवी वेगवेगळ्या उपमांनी वर्णिली आहे. सगळ्या साहित्यातल्या उपमा-उत्प्रेक्षा आईच्या मायेवर उधळल्या तरी त्या मायेचे मोठेपण शब्दांत पकडता येणार नाही. आईच्या ममतेची, वात्सल्याची सर दुसऱ्या कशालाही येणार नाही. माय म्हणजे साखरेचं पोतं आहे. सोन्याची पालखी आहे. दुधावरची साय आहे. सोन्याची उपमा तिच्या ममतेचे मूल्य सांगते; तर दूध-

साखरेच्या उपमा तिच्या स्वभावाची गोडी अधोरेखित करतात.

''तांबानी परात, पानी फेकं मी दारमा
मायना बिगर, चित लागे ना घरमा''

''माय माय करू, माय खोबरानं खांड
फिरनू काशीखंड, नही दिसनं तसं तोंड''

मातृवियोग ही सर्वांनाच असह्य अशी बाब आहे. मातेचे अकाली निधन तिच्या अपत्यांच्या दृष्टीने क्लेशदायक असते. मातेचे मुलाबाळांना अकाली सोडून जाणे, ही कल्पनाच भयंकर आहे. तिच्या घरातील अस्तित्वाशिवाय घराला पावित्र्य, सौंदर्य प्राप्त होत नाही. तिच्याशिवाय घराला 'घरपण' उरत नाही; म्हणून रितेपणाची ही जाणीव 'मायना बिगर चित लागे ना घरमा' या ओवीतून व्यक्त होते. काशीखंड म्हणजे चारी धाम फिरून आले; परंतु आईसारखी पवित्र मुद्रा कुठेही दृष्टीस पडली नाही, असे मनोगत ही स्त्री व्यक्त करते. ''स्वामी तिन्ही जगाचा आईविना भिकारी'' हे सुवचन तंतोतंत खरे आहे. 'आई' हा शब्द म्हणजे आ=आत्मा, ई=ईश्वर अशा दोन शब्दांचे मिलन आहे. आत्मा आणि ईश्वर या दोन्ही गोष्टी 'आई' शब्दात एकवटल्या आहेत. हे या ठिकाणी लक्षात यावे.

''बाप कसा म्हने, लेकी कायी कशी झायी,
कट-कटना घरमा, मन्ही नवती बई गयी''

''गोरं म्हनं आंगं, लावू कितली लाल माटी
हाई 'आयबानं' देनं, लयनू भरतार साठे''

''माय तोवर माया, बाप तोवर येरझार
भाऊ-भवजया, सग्या मावना बजार''

''माय-माय करू, माय जलेबी लागे गोड
बाप तिन्हा जोडीले, गोड्या आबांनं वं झाड''

आईवडिलांच्या असण्याने मुलीचे कोडकौतुक माहेरी चालते. ते नसल्यावर मात्र तिचे माहेरसुख दुरावते. आईवडील आहेत तोपर्यंत माहेरी जाणे-येणे असते. भाऊ-भावजया म्हणजे खोट्या मायेचा बाजार आहे असे ही स्त्री म्हणते. मुलीला सासर चांगले मिळणे हे आईवडिलांच्या दृष्टीने त्यांच्या जगण्या-मरण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे असते. दुर्दैवाने मुलीला सासर चांगले नाही मिळाले तर सर्वांत जास्त दु:ख बापाला होते. वरील सर्वच ओव्या आईवडिलांची थोरवी वर्णन करणाऱ्या आहेत. आईवडिलांचे स्थान विशेषत: सासुरवाशी मुलींच्या दृष्टीने अतिशय

महत्त्वपूर्ण ठरते. वेगवेगळ्या कारणांनी लुप्त होत चाललेल्या या ओव्यांचे संकलन - प्रकाशन होणे गरजेचे आहे. या प्रामाणिक हेतूने मी प्रस्तुत लेख लिहिला आहे.

ओव्यांची प्राप्ती

१) श्रीमती लक्ष्मीबाई अर्जुन भामरे, रा० कापडणे ता० जि० धुळे

२) श्रीमती येसाबाई हिरचंद भामरे, रा० कापडणे, ता० जि० धुळे

■

भ्रमणभाष : 098222 94255







अनुक्रमणिका

# बोलण्याच्या नाना परी

शरदिनी मोहिते

जिवापाड प्रेम करणाऱ्या चाहत्यांच्या तुफान गर्दीनं वेढलेला अभिनेता त्या गर्दीतल्याच एका चाहत्याला खवचट कुजकट टोमणा मारतो, ''तू स्प्राईट पी स्प्राईट...'' ही हेटाळणी ऐकताना वाटतं की ह्याचं हे बोलणं असं का हिंदळकतंय, मागेपुढे झाल्यासारखं, डचमळल्यासारखं? त्यानं स्वत: बोललेलं असो, की डबिंग प्रकरण असो, इतरही काही जाहिरातींमधलं त्याचं हिंदकळतं मराठी ऐकून असं काही कळमळतं, की वाटतं, नीट बोलता येत असेल तरच यानं मराठी बोलावं... पण हीच जाहिरात बंगाली चॅनेलवर ऐकली तेव्हाही 'तू स्प्राईट खा स्प्राईट' हे बोल असेच विचित्र गचके देत त्याच्या तोंडून बाहेर पडलेले ऐकले तेव्हा आणखीनच चमत्कारिक वाटलं. वाटत राहिलं की हा सिनेमातले संवाद तर चांगले बोलतो, मग हा ही विचित्र गती का देतोय शब्दांना अशी?...

काय आहे, शब्द आणि शब्दांचं वाक्य, वाक्यंच्या वाक्यं बोलण्याची एकेका भाषेची ढब असते. त्या ढबीतून त्या भाषेचा बोली ढंग, बोली स्वभाव प्रकट होत असतो. शब्दयोजना, शब्दांवरचा जोर, शब्दांच्या घटकांवरचे आघात, उच्चारातली मींड, उच्चाररचनेचा आब हा एकेका भाषेचा त्या-त्या प्रदेशातल्या बोलीतूनही विशिष्ट ठरावीक स्वरूपात आविष्कृत होत राहतो. याचं अगदी पटकन लक्षात येण्याजोगं उदाहरण म्हणजे मकरंद अनासपुरे अप्रतिमपणे बोलत असलेली मराठवाडी लकबीची भाषा. पूर्वी मच्छिंद्र कांबळींमुळे मालवणीची लज्जत चाखायला मिळत असे. त्या-त्या भाषा म्हणून त्यांच्याकडे अगत्याने आणि जिज्ञासेने पाहता येते.

परंतु जाहिरात आहे. कुठलीच विशिष्ट पद्धत न स्वीकारता सरळ प्रमाण-भाषा म्हणून बोलताना असा विचित्र धेडगुजरीपणा दिसला की चमत्कारिक तर वाटतंच पण रागही येतो. हे बोलणं कोणालाही खटकलं नाही – पडद्यावर बोलणाऱ्याला, जाहिरातीच्या दिग्दर्शकांना, लेखकांना, खुद्द कंपनीला जाहिरात दाखवणाऱ्यांना... कोणालाच ही बाब चुकीची म्हणून कळलं नाही? आश्चर्य आहे!





अनुक्रमणिका

एकूणच बोलणं कसं हवं? तर ऐकत राहावं असं. अगत्य वाटेल असं. गोड वाटेल असं. अर्थात 'बोलणं ग मंजुळ मैनेचं' नेहमीच असेल असं नाही. नेहमी नसतंही सहसा. पण स्वच्छ उच्चार असलेलं, बेतशीर, नेमके विचार मांडणारं असावं हे मात्र निश्चित.

... नाहीतर काही जण काय करतात, बोलायला सुरुवात करतात, आणि मधेच मूळ मुद्दा अर्धाच सोडून एकदम दुसऱ्याच विषयाकडे वळतात. रूळ बदलतात. ... कधी थोडं गूढ ठेवून देत अर्धवट बोलून थांबतातही!

काही जण रुक्षपणे बोलतात, जणू ऐकणाऱ्या तुमचा, विषयाचा किंवा एकूणच कशाचा तरी वीट आल्याप्रमाणे. प्रत्यक्ष तसं नसतंही बहुधा. पण शब्द विटून बाहेर पडतात खरे.

काही जणांच्या बोलण्यात खरखर असते! चरचर असते! तर काहींचं बोलणं गुळमट, गुळचट असतं!

काहींचं बोलणं रागावल्याप्रमाणे असतं. उदा० टेलिफोनमधले निरनिराळे ध्वनिमुद्रित संदेश, वसकन अंगावर आल्याप्रमाणे बोलणारी बाई आपल्याला ऐकवते की या लाइनमधले सर्व क्रमांक व्यस्त आहेत... किंवा तुम्ही फिरविलेला क्रमांक तपासून पाहा...

पुष्कळ जण भांडल्याप्रमाणेच बोलतात! काहींच्या शब्दफेकीत झोंबरा झटका असतो. प्रचंड उर्मटपणा किंवा दर्प-टेंभाही असतो काहींच्या बोलण्यात.

काही जण तुसडे वाटावे इतके तुटक बोलतात, तर काही जण चेंगट वाटावं असं बोलतात. काहींच्या बोलण्यात धुसफुस वाटावी अशी धसधस असते.

काही जण, काही जणी म्हणा, लाडेलाडेच बोलतात. तर काहींचं बोलणं गहिवर दाटल्याप्रमाणे असतं. आमच्या एका वहिनींचं बोलणं हुंदके देत बोलल्याप्रमाणे असायचं, आम्ही सुरुवातीला त्यांच्याकडे दचकून पाहायचो की त्या रडतायत की काय, तर त्यांचे डोळे चक्क हसत असायचे!

सुरेश सरैय्या क्रिकेटचे समालोचन करतात सुरेख, पण त्यांचा स्वर, आवाज अगदी खजील झाल्यासारखा आहे. त्याचप्रमाणे सामना जिंकल्यावर जेव्हा त्या कप्तानाची मुलाखत होते अशा वेळी राहुल द्रवीड बोलायचा तो जणू माफी मागितल्याप्रमाणे! माझं चुकलं, मला क्षमा करा म्हटल्यासारखं बोलणं आणि चेहरा सुतकी!

याउलट (हसतमुखानं) हसत-हसत बोलल्याप्रमाणे बातम्या देणाऱ्या स्नेहा आघारकर कोणा अपघाताची किंवा कोणाच्या निधनाची बातमी देतानाही हसतमुखानं देतात. आवाजात दिलगिरी किंवा खंत नाही, आवाजाची पट्टी बदलणं नाही... न्यूझीलंडचा अंपायर बिली बौडेन नाही का, कलात्मक आविर्भावात आनंदाने बाउंडरी किंवा सिक्सरच्या खुणा करतो. त्याची देहबोली अगदी पाहण्यासारखी असते. कोणी अपील नाकरताना हसत-हसत नाकारतो, त्याचप्रमाणे फलंदाज बाद झाल्याचंही नाचरेपणानं दाखवतो... एखाद्या सामन्यात तो शांत उभा असलेला दिसला, तर चुकल्या चुकल्यासारखं होतं...

काहीजण बोलायला सुरुवात करतात. एखादा शब्द बोलतात की हसणं सुरू. पुन: हसू आवरून तोच शब्द बोलतात आणि पुन: अनावर हास्याची उकळी... असा क्रम चालू राहतो... काहीजण मूळ मुद्याकडे येताना शब्द गोल-गोल फिरवत राहतात. त्यांना मुद्याचं बोला म्हणून सांगावं लागतं! काही जण आपला मुद्दा पटवण्यासाठी ऐकणाऱ्याच्या मांडीवर किंवा पाठीत थापट्या मारतात, तर काहीजण चिमटेही काढतात! म्हणजे हीही जोडभाषाच म्हणायची.

काहीजण इशारे देत बोलतात – 'लक्षात ठेव', 'ऐकून घे', 'काय समजले?', 'आलं का लक्षात?'... काहीजण एखादा मुद्दा पुन:पुन्हा सांगतात. विधानं केल्याप्रमाणे बोलतात काहीजण.

काहीजण वाघ मागे लागल्याप्रमाणे जलद बोलतात, तर काहींची असतात 'संथ गती बातमीपत्रं!' मधे-मधे थांबत पॉज घेत बोलायचं - शुद्धलेखन घातल्याप्रमाणे. काहींचं हे मध्येच थांबणं – याला धाप लागली की काय वाटायला लावतं. (उदा० दिलीप कुमारचं बोलणं) ऐकणाऱ्याचा जीव टांगणीला लावतं.

काही लोक खूप वरच्या पट्टीत आणि मोठ्यानं बोलतात तर काहीजण कुजबुजल्याप्रमाणे... आशालतासारखे लोक शब्द न् शब्द चावून-चावून बोलतात तर काहीजण शब्द थुंकल्याप्रमाणे बोलतात. जणू दातात अडकलेला सुपारीचा तुकडा थुंकावा तसं, म्हणजे मग कसं हलकंऽऽ वाटतं!

■

ए 1/4, शरयू, सरितानगरी, फेज 2
सिंहगड रस्ता, पुणे 411 030
दूरभाष : 020-2425 1353



अनुक्रमणिका

दखलयोग्य

# आग्रह आणि दुराग्रह

**पुष्पा भावे**

भाषा हा तुमचा माझा श्वास आहे. भाषा ही केवळ उच्चारलेल्या किंवा छापलेल्या शब्दांनी बनत नाही. भाषा हा तुम्ही-आम्हीच नाही तर अनेक वर्षे आपल्या पूर्वजांनी केलेला विचार आहे, जगलेले आयुष्य आहे. त्यामुळे आपण मराठीविषयी बोलतो तेव्हा आपण आपल्या जगण्याविषयी बोलतो, आपल्या संस्कृतीविषयी बोलतो. इंग्रजीने तुम्हां-आम्हांला पुष्कळ दिले हे खरे, मात्र इंग्रजी माध्यमाकडे वळणाऱ्या लोकांविषयीची तक्रार आहे ती इंग्रजीशी भांडण आहे म्हणून नाही, तर ती माणसे कुठेच रुजत नाहीत म्हणून. ती धड इंग्रजीही होऊ शकत नाहीत आणि मराठीशीही त्यांचा संबंध तुटलेला असतो!

सत्यजित राय हे वास्तविक पाहता पूर्णत: बंगाली कलाकार. त्यांनी जो अनुभव मांडला तो बंगालमधला; पण आज जगातील प्रत्येक शहरात सत्यजित राय यांचा चित्रपट पोचला आहे. हे आहे वैश्विक होत जाणे!

मुख्य मुद्दा आहे तो संस्कृती रुजवण्याचा. कुठेतरी संस्कृतीत आपल्याला रुजावे लागते. आपण मराठी असू तर मराठीत रुजू. पण मराठी असणे याचा अर्थ केवळ मिरवणुका काढणे किंवा केवळ प्रतीके वापरणे असा होत नाही. मराठी नावाची संस्कृती आहे. त्या संस्कृतीचा साध्या राहणीवर विश्वास होता. दुर्गाबाई भागवत का 'दुर्गाबाई' होऊ शकल्या? कारण त्यांना दोन खादीच्या साड्या पुरत होत्या. आज त्या प्रकारे साधे आणि म्हणून स्वतंत्र राहणे अनेकांना अवघड झाले आहे. एवढे सर्वजण वेगवेगळ्या हव्यासाने बांधले गेले आहेत. मराठी असणे म्हणजे केवळ शिवाजी महाराजांचे नाव घेणे नाही, तर शिवाजी महाराज काय होते ते समजावून घेणे. आज शिवाजी महाराजांचे नाव घेणाऱ्यांना ते फार समजले आहेत असे मला वाटत नाही. शिवाजी महाराजांनी आपली लाडकी लेक बजाजी निंबाळकरांना दिली होती, ज्या बजाजी निंबाळकरांनी आपल्या इच्छेने धर्मांतर केले होते. त्यामागे सामंजस्याची भूमिका होती. सरदारांच्या हातातून शस्त्र काढून घेऊन शिवाजी महाराजांनी ते मावळ्यांच्या हातात दिले तेव्हा त्यांनी हातात तलवार घेणाऱ्यांचे या देशातील सगळे शास्त्रच बदलले. त्यामुळे कुठल्याही मराठीपणाचा विचार करताना, आपल्याला हे जे संचित मिळाले आहे त्याचा



अनुक्रमणिका

विचार करावा लागेल.

आपल्या भाषेचा आग्रह जरूर असायला हवा; पण आग्रह स्वत:साठी, दुसऱ्यांसाठी नाही. आपल्याकडे दुसऱ्याच्या भाषेचा विचार करण्याचा सुंदर इतिहास आहे. गुजरातीचे पहिले व्याकरण लिहिले आपल्याकडील गांधीवादी काकासाहेब कालेलकर यांनी. ख्रिस्तपुराण फादर स्टीफन्सनी लिहिले. आपल्या संस्कृतीचा आग्रह धरणे आवश्यक, पण तो आग्रह धरत असताना दुसऱ्या संस्कृतीचा अधिक्षेप होता कामा नये. ज्या सहजपणे आपण सरदारजींचे विनोद सांगतो, त्या सहजपणे आपण स्वत:ची चेष्टा करतो/सहन करतो का? विनोदामध्ये स्वत:कडे पाहून हसणे हे खूप महत्त्वाचे असते. पण आपण चटकन दुसऱ्याला लक्ष्य करतो. भारत ही अनेक संस्कृतींची भूमी आहे, भाषांची भूमी आहे हे अत्यंत ताकदीचे आहे. प्रांतवर भाषारचना नंतर आली. त्याआधी भारताची भाषा नैसर्गिक रचनेनुसार असे. सोलापूरला जा, माणसे द्वैभाषिक होताना दिसतात. ती मराठी बोलतात, कानडी बोलतात, तेलगूही बोलतात. सीमेवरील माणसे एकापेक्षा अधिक भाषा बोलतात. त्यामुळे भाषा हा भांडणाचा मुद्दा करण्याची गरज नाही.

आपण प्रत्येकाने स्वत:ला विचारून पाहावे की मराठीचा वापर कमी झाला आहे याला मी स्वत: जबाबदार आहे की नाही? व्यवहाराचा मुद्दा सांगून आपण मुलांना इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घालतो तेव्हा हे विसरतो की जयंत नारळीकर बनारसला हिंदी भाषेतून शिकले, जे जगविख्यात वैज्ञानिक झाले आणि नंतर त्यांनी मराठीतून विज्ञानकथांचे लेखन केले. माणसाला अधिक भाषांचे संचित मिळाले की मनुष्य अधिक संपन्न होतो. केवळ संपन्नच नव्हे तर उदारहृदयी होतो, त्याची नजर विस्तृत होते.

माझा आक्षेप आहे तो मुठी आपटून भाषेविषयी बोलण्यावर. आज या मुठी आपटणाऱ्यांचा तरुणांवर खूप प्रभाव आहे. या तरुणांनी मुठी आपटणाऱ्यांच्या मागे राहावे यासाठी भाषाभिमानाचे कारण पुढे केले जाते; तेव्हा त्या तरुणांच्या प्रयत्नांची ईर्ष्या कमी होते. ही ईर्षा कमी होण्याला माझा आक्षेप आहे. तुम्हांला नोकऱ्या मिळत नाहीत, कारण परभाषकांना नोकऱ्या मिळतात. तुम्हांला नोकऱ्या मिळत नाहीत, कारण परप्रांतीयांना नोकऱ्या मिळतात... हे सारखे-सारखे सांगत राहण्याने ते सोपे वाटत जाते.

एका संस्थेतील नोकरीची संधी मराठी तरुणांना मिळावी म्हणून कानाकोपऱ्यात त्याची जाहिरात पोहोचविली, माहिती दिली; पण फक्त दोन

मराठी मुले आली आणि बाकी सर्व अमराठी, असेही अनुभव आहेत. त्यामुळे आपण मराठी मुलांना त्यांची गुणवत्ता वाढवण्याचे प्रोत्साहन देणार की नाही? सारखी सोपी कारणे दाखविली तर ते गप्प बसणार, कधी तरी आपले नेते आपले भले करतील अशी आशा बाळगत राहणार. अशी आशाळभूतांची सेना समाजाला वर येऊ देईल का? मराठी पेय प्या यासारख्या अनेक गोष्टी जागतिकीकरणाविरोधी प्रचार करताना आम्ही गावोगावी सांगतो. पण या वरवरच्या गोष्टींनी मराठीपण येईल का? खरोखर मराठी मराठी म्हणून ओरडणारी माणसे मराठी वाचतात का? मराठीकडे गंभीरपणे पाहतात का असाच माझा प्रश्न आहे. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयासारखी संस्था डबघाईला येऊन अनेक वर्षे झाली. आम्ही खूप प्रयत्न केले. दुर्गाबाई आणि मी उपोषणाला बसलो. तरी पुढे काही झाले नाही. अशी एखादी संस्थासुद्धा आपल्याला चालवता येत नाही? लाखो रुपये खर्च करून जिथे प्रत्येक उपनगरात देवळे बांधली जातात त्या महाराष्ट्र देशी मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय चालत नाही, मराठीच्या संशोधनासाठी जागा निर्माण होत नाहीत याला केवळ शासनच नव्हे; तर आपणही जबाबदार आहोत.

एक काळ होता गौरवाचा. केतकरांनी एकहाती ज्ञानकोश तयार केला. शास्त्रीबुवांनी संस्कृतिकोश केला; पण आता त्यासाठी संस्था उभ्या कराव्या लागतील. ही कामे प्राधान्याने हाती घ्यावी लागतील. त्यासाठी झिजणारे तरुण हवेत. केवळ घोषणांनी मराठीचे भले कसे होणार? आंदोलने महत्त्वाची आहेतच; पण तोंडात भडकावली; त्याऐवजी हात जोडून सत्याग्रह केला असता तर मराठीची शान वाढली असती.

प्रत्येक गोष्ट मला किंवा माझ्या नेत्याला पटलीच पाहिजे हे विपरीत आहे. लोकशाहीविरोधी आहे. सगळे आपल्या मनाप्रमाणे घडू शकणार नाही. सेन्ससचे भाषांतर करताना आपण शिरगणती हा शब्द वापरतो. धडगणती म्हणत नाही. ज्याला खांद्यावरचा विचार करण्याचा भाग आहे तो नागरिक. नेतृत्वाची केवळ भाषा संमोहक असणे पुरेसे नाही; लोकशाहीतील वक्तृत्व दुसऱ्याच्या विचारांना प्रवृत्त करणारे असावे. हात उचलून संवाद कसा होईल? थोडीशी त्या हातालापण शिस्त लावायला हवी. हाही मराठी संस्कृतीचाच भाग आहे.

मराठी संस्कृतीला तर इतके आयाम आहेत, ती अभिजनांची आहे, बहुजनांची आहे. ज्यांना ज्ञानेश्वर हा शब्द उच्चारता येत नाही त्यांनी ग्यानबा-तुकोबा म्हणत मराठीला जपले. छपाई नसताना, पाठांतराने वाढवले. मराठी या सगळ्या वेगवेगळ्या लोकांची आहे. बायाबापड्यांची आहे याची कृतज्ञता जाणली पाहिजे.

त्यांच्या जगण्याशी माझे काय नाते आहे यांचा विचार आजच्या पिढीला शिकवला नाही तर मराठीविषयी ओरडणार आणि नंतर डिस्कोला जाणार अशी विसंगती निर्माण होते.

मराठी भाषा आणि मराठी असण्याबद्दलचा अभिमान बरोबर आहे. पण त्या अभिमानाचा अहंकार आणि पोकळ अहंकार होणार नाही; हे पाहिले पाहिजे.

संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत विद्यार्थी म्हणून आम्ही सहभागी होतो. आम्ही जी स्वप्ने पाहिली ती आजही पूर्ण झालेली नाहीत. अनेक शासकीय समित्यांवर काम केल्यावर आज मी अत्यंत ठामपणे सांगू शकते की शासनाच्या पातळीवरील मराठीला मराठी कारकूनच जास्त विरोध करतात. इंग्रजी तर्जुमा तयार असतो, तो मराठीत आणायचा आळस! आज अनेक ठिकाणी हा आळस दिसतो आहे. विचार करण्याचाही आळस आला आहे.

नवीन पिढीतील अनेक मराठी तरुणतरुणी अनेक क्षेत्रांत पुढे जाण्याचा प्रयत्न करीत आहेत. त्याने मराठीला निश्चितच उंची मिळेल. अशा वेळी आम्ही ठरवू चित्रपटांत काय दाखवायचे ते आणि आम्ही ठरवू कलाकारांनी काय करायचे ते असे बोलून कसे चालेल? चार मूठभर माणसांनी एकत्र येऊन सर्वांचे मत ठरवणे हे लोकशाहीच्या विरोधात असल्याचे महात्मा फुल्यांनीही सार्वजनिक सत्यधर्मात सांगितले आहे. त्यामुळे या प्रकारचा दुराग्रह मोडावा लागेल. मराठीच्या गाभ्यात फार सुंदर गोष्टी आहेत. त्या आपण विसरत चाललो आहोत. तुम्ही मिरवणुकीत किती मिरवता हे महत्त्वाचे नाही. या गोष्टी जपण्यासाठी, तरुणांना तेथपर्यंत नेण्यासाठी, विचार करण्यासाठी प्रयत्न झाले तर काहीतरी निर्माण झाले असे म्हणता येईल. क्रौर्यालाच शौर्य मानणाऱ्या, आवेशाला बळी पडणाऱ्या तरुणांच्या फौजा निर्माण करण्याने काहीही साधणार नाही.

■

दै० लोकमत, दि० २९ नोव्हेंबर २००९
शब्दांकन : दीप्ती राऊत
(प्रेषक : नीलिमा गुंडी)

# बायामाणसांची भाषा?

प्रतिमा जोशी

मुलग्यांपेक्षा मुली पटकन भाषा अवगत करतात असं म्हणतात. एकूणच सर्व वयांच्या 'मुली' ज्या रेटने बोलत असतात तो पाहता हे खरं असावं. बोलता-बोलता आपल्या सर्व भावना (आजच्या भाषेत 'इमोशन्स') उघड करून दाखवण्याचं कसब त्यांच्या अंगी बहुधा जन्मत:च असतं.

'मी म्हणून चालवून घेतेय सर्व. दुसरी कोणी असती ना तर...' (इथे... नंतर मग समजलं असतं बरोबर, तिनं चांगल्या मिऱ्या वाटल्या असत्या डोक्यावर, जीव दिला असता कंटाळून, गेली असती सोडून. चांगलं नाचवलं असतं आपल्या तालावर इथपासून ते डिव्होर्सच दिला असता, मारली असती टांग, बरोबर कल्टी मारली असती, गावभर सीनशॉट केले असते अशी वाक्यं आपसुक येतात. बोलणारीचं वय शब्दांच्या प्रतवारीनुसार सत्तरपासून पंचवीसपर्यंत मोजावं.) असं नवऱ्याला कधीही न बोललेली बाई शोधूनसुद्धा सापडायची नाही.

'कशाला काही काळवेळ?' 'जिभेला काही हाड?', 'काही ताळतंत्र उरलंय की नाही?' 'शोभतं का हे असं वागणं?', असे प्रश्न मुख्यत: बायकांनाच पडू शकतात. अर्थात भाषा म्हटली तरी तिच्यावर जात, वर्ग, ग्रामीण, शहरी अशा वर्गवारीचा प्रभाव असतोच. ग्रामीण किंवा बहुजन समाजातल्या बायका 'कोंडून घालतात', बोलण्याचं 'दळण किंवा चऱ्हाट लावतात', 'धुमशान कांडतात' तर शहरी, अभिजन बायका 'इंगा दाखवतात', बोलण्याची 'टेप लावतात', 'गोंधळ माजवतात.' अभिजन बायकांची आमटी 'सरसरीत' असते तर बहुजन बायकांची 'पातळ' असते. बहुजन बायांची 'केसं गळतात' तर अभिजन बायांचे 'केस जातात'. अभिजन बाया 'वरण, भाजी आणि तोंडी लावण्यासाठी लोणचं घेतात.' तर बहुजन बाया 'डाळ, शाक आणि कोरड्याला कायतरी पिठी नाय तर चटणी/ठेचा वाटतात.'

निव्वळ शहरी भाग घेतला तरी भांडूपच्या सर्वोदय नगरातल्या, गोवंडीच्या शिवाजी नगरातल्या, ताडदेवाच्या चिखलवाडीतल्या, लालबागच्या रंगारी बदक

चाळीतल्या, जोगेश्वरीच्या मेघवाडीतल्या बाया बाजार नाहीतर मच्छी आणायला जातात आणि कोंबडीचा किंवा बैद्याचा नायतर कवटाचा रस्सा बनवतात तर शिवाजीपार्क परिसरातल्या, विलेपार्ल्याच्या सोसायटीतल्या, मुलुंडच्या गव्हाणपाडा एरियातल्या बाया फिश आणतात आणि चिकन किंवा एग करी करतात. तिथे दाट कालवणाला ग्रेव्ही म्हटलं जातं.

तसा तर इंग्रजीचा प्रभाव सर्वच समाजावर प्रचंड वाढलाय. बायकाही त्याला अपवाद नाहीत. आता एखादी गोष्ट छान नसते तर क्यूट असते. सुरेख नव्हे नाइस असते. माणसं नाश्ता करत नाहीत नि जेवतही नाही तर ब्रेकफास्ट घेतात आणि लंच/डिनर करतात. स्वैपाकघरात ... सॉरी, किचनमध्ये विळी नव्हे कटर असतो, तवा/कढई नव्हे फ्रायपॅन/डीप फ्रायपॅन असतात, खोबरं खवत किंवा किसत नाहीत तर ग्रेट करतात, कणिक मळत नाहीत तर डो करतात, बारीक तुकडे नव्हे चॉप करतात. हल्ली कोशिंबिरीपेक्षा सलाड प्रेफर केले जाते. मोड आलेल्या कडधान्यांपेक्षा स्प्राउट्सना प्रायॉरिटी असते. चांगुलंचुंगलं पौष्टिक नव्हे तर न्यूट्रिशनली रिच फूड खाल्लं जातं, पण ते खाताना बायका कॅलरी कॉन्शस असतात. तरीही वजन घटलं नाही तर योगासनं.... अंहं, योगा क्लासेस जॉइन केले जातात. कोणी भेटल्यावर नमस्कारचमत्कार होत नाहीत तर हाय, हॅलो होतं.

इश्श, अय्यापासून आयला आणि आता च्यायला असाही एक प्रवास आहे... तरुण मुलींचा. पूर्वी काही मुलं बावळट असायची आता घोन्चू असतात. आधी जी वस्तू सॉलिड मस्त असायची ती आता रापचिक किंवा ढासू झालीय. पूर्वीच्या सासूबाई फार त्रास देणाऱ्या असल्या तर त्या ललिता पवार असायच्या. आता मुली सासूलापण 'अगं आई' असं बिनधास्त हाक मारतात तेव्हा सासू बिचारी काय बोलणार? आता मुलीही नाक्यावर बसून पंढीगिरी करतात आणि ढिन्चॅक आयटम शोधतात. शिव्या तर आता मुलीही सर्रास देतात. हे चांगलं की वाईट माहीत नाही... पण नव्या पिढीनं बायांची आणि पुरुषांची भाषा असा भेदच मिटवून टाकलाय आणि नवी युनिसेक्स भाषा जन्माला घातलीय हे मात्र खरं!

■

दै० महाराष्ट्र टाइम्स, दि० १९ जून २००८
(प्रेषक : विजय पाध्ये)

दखलयोग्य

# जागतिकीकरणाच्या संदर्भात मराठी अस्मिता

इरगोंडा पाटील

अस्मिता याचा अर्थ आपल्या सत्त्वाची जाणीव असणे. अभिमान याचा अर्थ कदाचित गर्व असाही होईल. त्यामध्ये दंभ असू शकतो. दंभ अगर गर्वामध्ये अहंकार आहे. अस्मितेमध्ये सत्त्व आहे. भाषिक अस्मिता याचा अर्थ असाही होऊ शकतो की, माझ्या सत्त्वाची मला जाणीव आहे. माझे स्वतंत्र अस्तित्व ही माझी 'ओळख' आहे. ती पुसताना वेदना होणार आहेत. 'विज्ञान आणि तंत्रज्ञाना'त झालेल्या क्रांतीमुळे, आधुनिक मानवाला आपल्या 'संस्कृती'चा शोध घेताना इतरांकडून घेण्याची आपली क्षमता किती आहे, यावर 'अस्तित्व' अवलंबून आहे. 'अस्तित्व' टिकवल्यानंतरच 'अस्मिते'चा जन्म होतो. आजच्या संक्रमणकाळात त्याचबरोबर जागतिकीकरणातून जे घडू लागले आहे, त्यातून 'माहिती तंत्रज्ञानाच्या क्रांती'ने जगभरातील अनेक बोलीभाषा मृत्युपंथाला लागतील, असे भाषा वैज्ञानिक सांगू लागले आहेत.

आजचे सामाजिक वास्तव काय आहे? आजचा प्रगत समाज तो आहे की, ज्यांना या व्यवस्थेत सर्व प्रकारच्या संधी उपलब्ध आहेत, त्यामुळे त्यांची प्रगती झाली आहे. जे संधीपासून वंचित आहेत, ते मागास राहिले आहेत. जे मागासलेले आहेत त्यांचा 'बुद्ध्यंक' कमी आहे, असा याचा अर्थ नाही. मागासलेपण हे संधीमधील विषमतेचे 'अपत्य' आहे. आज इंग्रजी ही प्रगत ज्ञान-विज्ञानाची, उच्च शिक्षणाची भाषा बनली आहे. केवळ इंग्रजांची ही भाषा राहिलेली नाही. भारतात इंग्रजी बोलणाऱ्यांची संख्या ही इंग्लंडपेक्षाही जास्त आहे. हा वर्ग सर्व प्रकारच्या निर्णयप्रक्रियेमध्ये आहे. 'बहुजन समाज' हा आपल्या मातृभाषेतून आपला दैनंदिन भाषिक व्यवहार करतो आहे. बहुजनांना आपली उन्नती करून घ्यायची असेल, तर त्यांना 'निर्णयप्रक्रिये'त सहभागी व्हावे लागेल. त्यासाठी त्यांना ज्या भाषेत 'निर्णयप्रक्रिया' सुरू आहे, त्या भाषिक व्यवहारात सहभागी व्हावे लागेल. तरच त्यांचे 'अस्तित्व' टिकणार आहे.

अशा या संभ्रमित कालखंडात प्रगत समाज हा बहुभाषिक समाज असणार आहे. एकभाषिक समाज हा मागासलेला समाज असणार आहे. 'भाषिक





अनुक्रमणिका

अस्मिता' ही आपल्या सत्त्वाशी निगडित असल्याने इतर 'प्रगत भाषा' अवगत करताना आपल्या 'मातृभाषे'वर हे आक्रमण आहे, असा भ्रम होऊ शकतो. परंतु 'भाषा- विज्ञान' असे म्हणते की, मातृभाषेचा पाया उखडून कोणतीही इतर भाषा आत्मसात करणे चुकीचे आहे. ज्यांचे मातृभाषेवर प्रभुत्व असते, तेच इतरही भाषांवर प्रभुत्व मिळवू शकतात. आपल्या मातृभाषेतून भाषिक व्यवहार करणे कमीपणाचे वाटत असेल तर ते चुकीचे आहे. मातृभाषा चांगली असल्याखेरीज जगातील कोणतीही भाषा चांगली येऊ शकत नाही. बहुभाषिक प्रगत समाजात अनेक भाषा 'प्रथम-भाषा' राहणार आहेत. पूर्वी मानवी विकासाच्या पहिल्या टप्प्यात 'एकभाषिक' समाज होता. समाजाचे अभिसरण गतीने सुरू असल्याने 'बहुभाषिक' समाजाकडे वाटचाल होत आहे. काही मानववंशशास्त्रज्ञ आणि भाषा वैज्ञानिक असे म्हणू लागले आहेत की, मानवी समाज पुढे एकवंशीय आणि जगाची एकच भाषा असणारा बनेल. आजही एकभाषिक वसाहतवादी इथेही आहे. 'वसाहतवादी' हे शोषण करीत असतात.

'भारतीय भाषां'मध्ये सर्वांत प्राचीन भाषा 'तमिळ' आहे. 'मराठी'ला हजार एक वर्षांची परंपरा आहे. ज्ञानग्रहणाची परंपरा संस्कृतमधून होती. बुद्ध, महावीर आणि बसवेश्वर यांनीं भाषिक क्रांती करून जनसामान्यांच्या भाषांना धर्मभाषा बनविले. चक्रधरांनी मराठीला धर्मभाषेचा दर्जा दिला. इतिहास असेही सांगतो की, प्रतिक्रांती करून यांना संपविण्यात आले. बहुजनांची पुन्हा अधोगती झाली. वर्ण आणि जातीसंघर्ष हा भारतीय समाजात सतत मध्यवर्ती राहिलेला आहे. सर्व प्रकारच्या सत्तेपासून जो समाज दूर फेकला जाईल, तो प्रगती करू शकत नाही. इंग्रजी ही आज जागतिकीकरणाची भाषा आहे. सर्वच भारतीय भाषांना थोर परंपरा आहे, तरीही त्यांना त्या-त्या प्रदेशाच्या मर्यादा आहेत. याचा अर्थ, त्यांच्या वैचारिकतेलाही मर्यादा आहेत असे नाही. तरीही इंग्रजांपासून दूर राहाल तर फेकले जाल.

समाजातील नवशिक्षितवर्ग हा आपल्या मातृभाषेपासून अलग होऊ पाहतो आहे. इंग्रजी भाषा ही जरी प्रगत समाजाच्या भाषिक व्यवहाराची भाषा असली, तरी एकच मातृभाषा असणारे दोन बुद्धिजीवी आपल्या मातृभाषेतून संवाद न करता इंग्रजीतून संवाद करताना दिसतात. इतरांपासून आपण वेगळे आहोत हे त्यातूनच दाखविणे किंवा आपल्या मातृभाषेतून बोलणे मागासलेपणाचे आहे असे वाटणे, यातील फरक आपण समजून घेत नाही. त्यामुळे आपल्या मातृभाषेच्या विकासाला मर्यादा पडतात. आपल्या मातृभाषेची शब्दसंख्याही मर्यादित राहते.

ज्या भाषांनी जगभरच्या भाषांतील शब्दांचा स्वीकार केला, त्याच भाषा समृद्ध बनल्या आहेत. म्हणून आपल्याकडून इतरांनी किती घेतले यावरून आपली उंची मोजत बसण्यापेक्षा इतरांकडून, इतर भाषांकडून आपण किती घेतले, हे अधिक महत्त्वाचे आहे. यातूनच आपल्या भाषेचा विकास होणार आहे. आपले जीवन समृद्ध बनणार आहे.

मानव हा अनेक भाषा बोलणारा आहे. त्यामुळे प्रगत समाज हा बहुभाषिक समाज असणार आहे. भारतातील 'शहरे' हे त्याचे मॉडेल राहणार आहे. या प्रगत समाजात आपल्याच मातृभाषेतून संवाद करण्यासाठी आपल्याच मातृभाषेतील समूह सभोवताली असणार नाही. त्यांच्या मातृभाषा वेगवेगळ्या असणार आहेत. त्यांची संपर्कभाषा म्हणून 'इंग्रजी' घडली आहे. तिला आज दुसरा पर्याय नाही. इतरांशी संवाद साधणे हेच भाषेचे प्रधान उद्दिष्ट आहे. वेगवेगळ्या प्रदेशांत वेगवेगळ्या 'ध्वनी व्यवस्था' निर्माण झाल्या. प्रत्येक भाषा वेगळी आहे; कारण प्रत्येक भाषेची 'ध्वनी व्यवस्था' वेगळी आहे. मानवी प्रयत्नांतून ती निर्माण झाली आहे. लिपी ही तर 'ग्राफिक सिंबॉल' आहे. ती उच्चारशास्त्राप्रमाणे असेलच असे नाही.

मानवाला प्रथम आपल्या 'अस्तित्वा'साठी संघर्ष करावा लागेल. जोवर आपण आपल्या मातृभाषांतून दैनंदिन भाषिक व्यवहार करीत राहू, तोवरच त्या भाषा जिवंत राहणार आहेत. दरवर्षी अनेक भाषा मरत आहेत; कारण ते समूह लहान आहेत. आफ्रिकेतील अनेक भाषा मृत्युपंथाला लागल्या आहेत. मराठीतून मोठ्या प्रमाणात व्यवहार आजही सुरू आहे. इंग्रजी भाषा हे आक्रमण नसून इंग्रजी आत्मसात करूनच मराठी जिवंत राहणार आहे; कारण भारतातील 'बहुजन' हे 'बहुभाषिक' आहेत.

■

दै० महाराष्ट्र टाइम्स, दि० १ मे २००८





अनुक्रमणिका

# विल्यम सफायर

(सुप्रसिद्ध राजकीय व भाषाविषयक स्तंभलेखक, पुलित्झर पारितोषिक विजेते, आणि रिचर्ड निक्सन यांचे काही काळ सल्लागार असलेले विल्यम सफायर यांचे २५ सप्टेंबर २००९ रोजी निधन झाले.)

एका लेखात त्यांनी रिट्रोनिम (Retronym) या शब्दाचा विचार केला आहे. रिझोनिम म्हणजे एखाद्या नव्या आधुनिक प्रकारच्या वस्तूच्या आगमनामुळे, त्या वस्तूच्या आधी वापरल्या जाणाऱ्या जुन्या वस्तूला दिलेले नाव उदा० ई-मेल आल्यानंतर पोस्टाच्या माध्यमातून पाठवायच्या टपालाला आता स्नेल मेल (snail mail) (स्नेल म्हणजे गोगलगाय) म्हटले जाते. जुन्या वस्तूला हे जे नवे नाव मिळाले, त्यालाच रिट्रोनिम असे म्हणतात. डिजिटल प्रकारची रिस्टवॉचेस आल्यावर जुन्या प्रकारच्या मनगटी घड्याळांना आता ॲनालॉग वॉचेस हे नाव मिळाले. आजकाल सर्वजण इलेक्ट्रिक गिटारच वापरतात. म्हणून त्यांना नुसते गिटार असे म्हणायचे आणि त्यांच्या आधीच्या गिटारना आता 'अकूस्टिक गिटार' असे म्हटले जाते. 'वॉटरबोर्डिंग्ज' (Waterboardings) हा शब्द ऐकला आहे? दहशतवाद्यांच्या छावण्यांमध्ये त्यांना बोलते करण्यासाठी छळण्याचा हा एक मार्ग आहे. सफायर यांनी या शब्दाचा अर्थ स्पष्ट केला होता. वॉटरबोर्डींग म्हणजे एका सी-सॉसारख्या फळीवर कैद्याला जखडायचे आणि मग त्याचे डोळे पाण्याखाली असे दाबायचे, की त्याला आपण बुडतोय असे वाटायला लागेल. सफायर यांना एका चित्रपटाच्या पहिल्या खेळासाठी आलेल्या आमंत्रणपत्रिकेत म्हटले होते, 'कॉकटेल अटायर'. याचा अर्थ छान कपडे असा होतो. नेहमीचेच कपडे नव्हेत, की भडकही नव्हेत!

एन०डी० आपटे

दै० सकाळ, दि० ५ ऑक्टोबर २००९

# भाषा : उत्क्रांतीतील ‘क्वान्टम’ उडी

कुमार केतकर

स्टीव्हन पिंकर हा सध्या जगातला एक प्रकांड भाषतज्ज्ञ, संशोधक आणि मेंदू व कॉन्शियसनेस या विषयावर प्रयोग व चिंतन करणारा विद्वान म्हणून ओळखला जातो. मॅसेच्युसेट्स विद्यापीठातील या प्राध्यापकाने ‘द लँग्वेज इन्स्टिंक्ट-हाउ द माइंड क्रिएट्स लँग्वेज’ हा ग्रंथ लिहून एकच खळबळ माजवून दिली होती.

मूल साधारणपणे वर्षाचे झाले की ते एकाक्षरी ध्वनिसंवादाच्या पुढे जाऊ शकते. (जी मुले जन्मतःच मुकी व कर्णबधिर असतात, त्यांचा संवाद मात्र हातवारे, हावभाव, वस्तू वा खेळणी इत्यादींच्या मदतीने होऊ लागतो आणि पुढे मुख्यतः त्यांची संवादभाषा तीच राहते. आता जगात त्या भाषेलाही एक स्वतंत्र ‘हावभावाचे व्याकरण’ वा संदेश-पद्धती दिली जात आहे.)

मूल वर्षाचे होते तेव्हा त्याला त्या ध्वनींमधून शब्द तयार होतात, ते जाणवू लागते. ‘बेबी, इकडे बघ. मी कोण आहे? - आई! आणि हे कोण? बाबा- बा बा!’ या संवादाला शब्दभाषारूप देण्यासाठी इतरही बरेच हावभाव करून, टाळ्या वाजवून मुलाचे लक्ष वेधून घ्यावे लागते. त्या मुलाला कळतात ते विशिष्ट रूपातून येणारे ध्वनी. त्याला ‘इकडे बघ’ हे हावभावावरून, ‘हे कोण? बाबा’ हे अंगुलिनिर्देश केल्यामुळे समजते. त्यांपैकी कोणत्याच शब्दाचा अर्थ जरी त्या मुलाला कळला नाही तरी त्यांतील ‘भाव’ समजतो. या लोकांच्या सहवासात आपण सुरक्षित आहोत, आपल्याला दूध-पाणी वगैरे मिळते, आपण रडलो, ओरडलो तर हीच माणसे आपल्याकडे पाहतात, जवळ घेतात - या सर्व ध्वनी, स्पर्श, चव, गंध, नजर यांच्या मदतीने शब्द, भाव, अर्थ आणि संदर्भ त्या मुलाला लागतात. खऱ्या अर्थाने शब्दरूप अर्थपूर्ण भाषेचा जन्म तेव्हा - म्हणजे मूल दीड-दोन वर्षांचे झाल्यानंतर होतो, असे म्हटले तरी चालेल.

स्टीव्हन पिंकर तर म्हणतात की, वर्ष-दीड वर्षाच्या आतचे मूल आणि घरात पाळलेला कुत्रा यांची संवादक्षमता साधारणपणे एकाच प्रकारची व गुणवत्तेची असते. आपण जेव्हा कुत्र्याला- ‘टॉमी, ऊठ तिथून.... जा तिकडे .. तिकडे जा... जा बघू’, असे म्हणतो तेव्हा त्याला सरावाने व हावभावाने इतकेच कळते की, आपल्याला ‘टॉमी’ म्हणून संबोधतात आणि उरलेल्या शब्दांचा अर्थ टोनवरून व हावभावांवरून तो ओळखतो. शब्द, भाषा न समजताही भाव, भावना हे सर्व

हावभावांवरून अतिशय उत्कटतेने कुत्रा, मांजर, गाय, घोडा, हत्ती इतकेच काय - वाघ, सिंह आणि पक्ष्यांनाही कळते.

परंतु त्यांच्याबरोबरच्या संवादातून भाषा जन्माला येत नाही, संवादक्षमता वाढत नाही, विचार तयार होत नाहीत, आजूबाजूच्या परिस्थितीचे सर्वंकष भान येत नाही. माणूस (अशिक्षित माणूससुद्धा!) भाषारूप संवादक्षमता प्राप्त झाली की मानसिक उत्क्रांतीच्या एकदम वरच्या टप्प्यावर 'क्वान्टम जंप' घेऊन पोचतो. माणसाला शब्द-भाषाक्षमता प्राप्त झाली नसती तर आपल्यात आणि इतर प्राणिसृष्टीत फारसा फरक पडला नसता. आपण सर्व टारझन राहिलो असतो.

दै० लोकसत्ता, दि० २९ ऑगस्ट २००९
(प्रेषक : दिशा केळकर)

**भाषा - त्यांच्या आणि आपल्या**

जगाची लोकसंख्या सुमारे ६२० कोटी. परंतु म्हणून त्याची सरासरी काढता येणार नाही. कारण चिनी भाषा बोलणाऱ्यांची (सर्व फरक व बोली विचारात घेऊन) संख्या जगात सुमारे १३० कोटी आहे. म्हणजे एकूण लोकसंख्येच्या जवळजवळ एक चतुर्थांश. इंग्रजी भाषा बोलणाऱ्यांची संख्या ४० कोटींच्या आसपास. स्पॅनिश सुमारे ३० कोटी, हिंदी २५ कोटी, अरेबिक २० कोटी, रशियन १६ कोटी, पोर्तुगीज १४ कोटी, जपानी १२ कोटी, जर्मन ११ कोटी, आणि आपली मराठी १० कोटी! (हे आकडे जगातील लोकसंख्या डेटाबेसवरून अपडेट करून घेतलेले आहेत. त्यामुळे त्यात थोडाफार फरक असू शकतो - पण थोडाफारच.)

बहुतेक भारतीय भाषकांची संख्या युरोपातील अनेक भाषा बोलणाऱ्यांपेक्षा कितीतरी जास्त आहे. उदाहरणार्थ, इटालियन सहा कोटी, तर तामिळ सात कोटी. फ्रेंच आठ कोटी तर बंगाली (बांगला देश धरून) सुमारे २० कोटी!

- कुमार केतकर,
दै० लोकसत्ता, दि० २९ ऑगस्ट २००९
(प्रेषक : दिशा केळकर)



अनुक्रमणिका

दखलयोग्य

# मुरुडची भाषा

**विनायक नारायण बाळ**

माझ्या गावकऱ्यांची भाषा अगदी रोखठोक. ते बोलताना तोंडाऐवजी नाकाचा वापर करतात की काय, असे ऐकणाऱ्याला वाटेल.

बरेचसे शब्द त्यांनी मोडून घेऊन मुखात बसविलेले आहेत! म्हणजे घ्यायचं, द्यायचं, करायचं असे म्हणायचं असेल, तर घैचं, दैचं, कराचं असे बोलतात.

सरळ नावाने कुणी हाक मारत नाही. मारली, तर ऐकणाराही 'ओ' देत नाही! सीतारामला 'शित्या', परशुरामला 'पर्शा' पुकारले, तरच त्यांच्या कानात शिरते!

नावाचा उच्चार विशेषणाने करणे हा आणखी एक इथला विशेष आहे. हे विशेषण त्या माणसाच्या विशिष्ट कृतीवरून किंवा त्यांच्या घराण्यात घडलेल्या एखाद्या गोष्टीवरून दिले जाते. उदाहरणार्थ, एखाद्या नाटकाची अति हौस असलेल्या एखाद्या दत्तात्रय नावाच्या माणासला 'नाटकी दत्तू' म्हणून ओळखले जाते. नारळांचा मोठा व्यापारी असलेल्या कुणा मधू नावाच्या माणसाला 'नारळी मधू' म्हटले जाते. विवाहित स्त्रीचा उल्लेख तर तिच्या नवऱ्याच्याच नावाने होतो. म्हणजे नवऱ्याचे नाव 'शिवराम' असेल, तर पत्नीला 'शिवरामी' म्हणतात.

एखाद्या घरी स्वत: पैसे देऊन राहिलेल्या म्हणजे 'पेईंग गेस्ट' माणसाला चक्क 'पोषण्या' म्हणून ओळखतात.

देवळामधील देवाचा उल्लेख त्याच्या नावाने न करता फक्त 'श्री' म्हटले जाते. 'श्रीच्या देवळात', 'श्रीला अर्पण', 'श्रीच्या आशीर्वादाने' असे उल्लेख येतात.

असे जवळपास प्रत्येक व्यक्तीला मूळ नावापेक्षा इतर नावानेच गावात अधिक ओळखले जाते.

दिवसभरात तोंडातून एकही शिवी गेली नाही, तर तो निश्चितच या गावचा नव्हे!

शिव्यांच्या वापराने सांगायची गोष्ट व्यवस्थित ठसविली जाते, असा दृढ समज असावा! अगदी प्रेमाने सांगितलेल्या गोष्टीतही शिवी येणारच! लोकांच्या तोंडून येणाऱ्या म्हणी खास लक्ष द्याव्या अशा आहेत. त्यांतल्या काही वानगीदाखल अर्थासह पाहू या-

'बोडकीला न्हाव्याची लाज कशाला?' - पतिनिधनानंतर केशवपन केलेली स्त्री म्हणजे बोडकी. थोडक्यात ताकाला जाऊन गाडगे लपविणे अशा अर्थी.





अनुक्रमणिका

बेत बाजीरावाचे प्रकाश सनकड्यांचे - हाती काहीच नाही पण स्वप्नं मात्र भली मोठी रंगवायची.

सनकड्या म्हणजे काटक्या-कुटक्या. पूर्वी अगदी गरीब कुटुंबांच्या घरात त्या पेटवून उजेडाची गरज कशीतरी भागली जायची.

'भट सांगेल, ती आमुश्या (अमावस्या) न्हावी ठेवील त्या मिशा, राजा दाखवील ती दिशा' - एखादी गोष्ट अगदी अपरिहार्यपणे स्वीकारावी लागणे अशा अर्थी.

'चौघात मरण लग्नासमान' - सगळ्यांच्या बरोबरीने दुःख आले, तरी आनंदासारखे मानणे.

या म्हणीला जोडून दुसरी एक म्हण प्रचलित आहे, ती अशी

'मेहुणीच्या लग्नात जावई कस्पटासमान' - मेहुणीच्या लग्नाच्या वेळी दुसऱ्या जावयाचे स्वागत करायला सासुरवाडी उत्सुक असते. त्या गडबडीत मोठ्या जावयाकडे फारसे लक्ष दिले जात नाही. थोडक्यात, जुलुमाचा रामराम.

'मांडीखाली आरी, चांभार पोरांना मारी' - म्हणजे काखेत कळसा गावाला वळसा.

आरी हे चर्मकामातले हत्यार आहे.

(प्रेषक : राम पटवर्धन)

**मानवी भाषेचे वय - अज्ञात!**

ध्वनिविशेषांची मर्यादा ओलांडून माणूस पहिले-वहिले मोडके-तोडके शब्द कधी वाणीबद्ध करू लागला, त्यातून शब्दसंकुल कसे करू लागला, वाक्यरचना आणि शब्दांची संवादी योजना करू लागला, यांबद्दलचे संशोधन अजून बरेच प्राथमिक अवस्थेत आहे. जुने हाडांचे सापळे वा कवट्या सापडू शकतात, पण जुने शब्द कसे सापडणार? ते तर केव्हाच - म्हणजे बोलता बोलताच हवेत विरून जात होते. (शब्द बापुडे केवळ वारा!) त्यामुळे प्राचीन माणूस बोलायला लागल्यापासून ते त्या भाषेला संकेत संवादाचे रूप प्राप्त होईपर्यंत नक्की किती वर्षे गेली असावीत, हे अजूनतरी निश्चितपणे सांगता आलेले नाही.

- कुमार केतकर,
दै० लोकसत्ता दि० २९ ऑगस्ट २००९
(प्रेषक : दिशा केळकर)

# महाराष्ट्र शासन निर्णय - २००९

## देवनागरी लिपी व वर्णमाला

(लेखनविषयक शासकीय निर्णयाची पृष्ठे हिवाळा २०१० अंकात दिली आहेत. या निर्णयाचा उर्वरित भाग यापुढे दिला आहे. त्यानंतर त्यासंबंधीच्या दोन प्रतिक्रिया दिल्या आहेत. – संपादक)

**परिशिष्ट तीन**

**विरामचिन्हे आणि इतर चिन्हे**

बोलण्यातील विविध भाव व आशय लेखनामध्ये नेमकेपणाने व्यक्त करण्यासाठी जी विविध चिन्हे वापरली जातात ती विरामचिन्हे होत. विरामचिन्हे लिपीला पूरक असतात. सर्वसाधारणपणे लेखनामध्ये वापरली जाणारी विरामचिन्हे व अन्य चिन्हे पुढीलप्रमाणे आहेत.

| | |
|---|---|
| १. पूर्णविराम | . |
| २. प्रश्नचिन्ह | ? |
| ३. उद्गारचिन्ह | ! |
| ४. स्वल्पविराम | , |
| ५. अर्धविराम | ; |
| ६. अपूर्णविराम किंवा द्विबिंदु चिन्ह | : |
| ७. संयोगचिन्ह | - |
| ८. अपसरण चिन्ह | – |
| ९. लोपचिन्ह | ... |
| १०. विकल्पचिन्ह | / |
| ११. दुहेरी अवतरणचिन्ह | सुरू होणारे अवतरण चिन्ह - “ <br> बंद होणारे अवतरण चिन्ह - ” |
| १२. एकेरी अवतरणचिन्ह | सुरू होणारे अवतरण चिन्ह - ‘ <br> बंद होणारे अवतरण चिन्ह - ’ |
| १३. अधोरेखा शब्द | शब्द |

---

महाराष्ट्र शासन-निर्णय - २००९ /...४७

| | |
|---|---|
| १४. फुल्या | ××× |
| १५. काकपद | ʎ |
| १६. वरीलप्रमाणे | --''-- |
| १७. गोलकंस | ( ) |
| १८. चौकोनी कंस | [ ] |
| १९. महिरपी कंस | { } |
| २०. संक्षेपचिन्ह | (.) (०) |
| २१. एकेरी दंड | । |
| २२. दुहेरी दंड | ॥ |

**परिशिष्ट चार**

**वर्णक्रम**

१. वर्णक्रम स्वर, स्वरादी, व्यंजने आणि शेवटी क्ष, ज्ञ ही विशेष संयुक्त व्यंजने असा ठेवावा.

२. कोश, सूची व तत्सदृश वाङ्मयासाठी आवश्यक त्या नोंदी अकारविल्हे करताना वरील वर्णक्रम वापरावा. कोशामध्ये अकारविल्हे रचना करताना अंक (० ते ९) आणि विरामचिन्हे (, ; इत्यादी) ''अ'' पासून प्रारंभ होणाऱ्या स्वरांच्या आधी घ्यावीत. थोडक्यात प्रथम अंक द्यावेत; त्यानंतर विरामचिन्हे द्यावीत आणि त्यानंतर उपरोक्ताप्रमाणे वर्णक्रम ठेवावा.

'**क**' या अक्षराने सुरू होणाऱ्या शब्दांच्या उदाहरणाने हा वर्णक्रम येथे स्पष्ट करून दाखवलेला आहे.

स्वर जोडल्यानंतर 'क' या व्यंजनाक्षराचा मुख्य क्रम पुढीलप्रमाणे राहील : क का कि की कु कू कृ क्लृ के कॅ कै को कॉ कौ

क या अक्षरानंतर क्रमाने स्वर असणारे शब्द उदा०

कअ ..... ते कऔ ... पर्यंत.

उदा० कइ, कई, कऊबऊ ... इत्यादी

त्यानंतर कं ने सुरू होणारे सर्व शब्द. यामध्ये परत कंअ .... पासून कंज्ञ पर्यंत

उदा० कं कंक, कंगाल, कंचन, कंजर, कंटाळा, कंठ, कंड, कंद, कंस... इत्यादी.

त्यानंतर कः ने सुरू होणारे सर्व शब्द. यामध्ये परत कःअ...पासून कःज्ञ... पर्यंत

उदा० कः पदार्थ ... इत्यादी.

त्यानंतर 'क' पुढे क्रमाने सर्व व्यंजने येणारे शब्द कक ..... कका.... ककौ पर्यंत : अशा प्रकारे क ते ज्ञ पर्यंत प्रत्येक व्यंजन क्रमाने घेणे. यानंतर का, कि, की.... असे क्रमाने कौ पर्यंतचे शब्द वर नमूद केलेल्या वर्णक्रमाने घेणे.

कौ पर्यंत सर्व शब्द झाल्यानंतर 'क' ची जोडाक्षरे घेणे.

जोडाक्षरामध्ये अक्षरे ज्या क्रमाने आलेली असतील ती लक्षात घेऊन वरील वर्णक्रमानुसार त्यांचा क्रम लावणे उदा०

क् + य = क्य / क्या.... ने सुरू होणारे शब्द

क् + र = क्र / क्रा / क्रि .... ने सुरू होणारे शब्द

क् + ल = क्ल / क्ला / क्लि ... ने सुरू होणारे शब्द

क् + व = क्व / क्वि ... ने सुरू होणारे शब्द

**संगणकावर वर्णक्रम पाहण्याची पद्धत**

३. अक्षर हे एक किंवा अधिक वर्णांचे बनले असल्यामुळे अक्षरांचा क्रम लावताना त्याची वर्णरचना विचारात घेणे व त्यासाठी वर्णस्तंभाची मांडणी करणे अतिशय आवश्यक असते. मुद्रित मजकुरात (शब्दकोश इ०) अक्षरांचे क्रम पाहावयास मिळतात; तथापि संगणकीय संदर्भात शब्दांच्या वर्णरचनेचे उभे स्तंभ तयार करून प्रत्येक स्तंभावारी वर्णक्रम पाहावा लागतो.

उदाहरण पहिले - दोन शब्दांचा स्थानक्रम विचार :

१. गोप = ग् + ओ + प् + अ

२. गोपी = ग् + ओ + प् + ई

पहिल्या व दुसऱ्या शब्दातील वर्णरचनेतील पहिले तीन वर्ण एकसारखे असल्याने चौथ्या स्तंभावर जाऊन जो वर्ण, वर्णक्रमात प्रथम असेल तो शब्द प्रथम यावयास हवा. या उदाहरणात अ हा वर्ण प्रथम येईल व ई हा वर्ण नंतर येईल. त्यामुळे वर्णक्रमानुसार गोपी हा शब्द गोप या शब्दानंतर येईल.

उदाहरण दुसरे - तीन शब्दांचा स्थानक्रम विचार

कठोर = क् + अ् + ठ् + ओ + र् + अ

कंठ = क् + अ + ं + ठ् + अ

काठ = क् + आ + ठ् + अ

या शब्दांचा क्रम लावताना पहिल्या स्तंभातील वर्ण एकसारखे असल्यामुळे दुसऱ्या स्तंभातील वर्णाचा विचार करावा लागेल.

पहिल्या दोन शब्दांच्या वर्णरचनेत दुसऱ्या स्तंभात अ हा वर्ण सारखा आहे व तिसऱ्या शब्दातील दुसऱ्या स्तंभात आ हा वर्ण आहे. आ हा वर्ण अ च्या नंतर येत असल्यामुळे तो शब्द पहिल्या दोन शब्दांच्या नंतरच येणारे हे निश्चित झाले. आता पहिल्या दोन शब्दांत कोणता क्रम येतो ते पाहू. त्यासाठी तिसऱ्या वर्णस्तंभाकडे पाहावे लागेल. वर्णाक्रमामध्ये स्वरादिचिन्ह आधी घ्यावयाचे असल्यामुळे दुसऱ्या शब्दातील स्वरादिचिन्ह, अनुस्वार हे ठ् वर्णाच्या आधी येईल व दुसऱ्या शब्दाला (कंठ) पहिला स्थानक्रम द्यावा लागेल. त्यामुळे शब्दांचा स्थानक्रम पुढीलप्रमाणे राहील.

१. कंठ  २. कठोर  ३. काठ

उदाहरण तिसरे - जोडाक्षरयुक्त शब्दातील स्थानक्रमाचा विचार :

१. क्रम = क् + र् + अ + म् + अ

२. किंचित = क् + इ + ं + च् + इ + त् +अ

३. क्वचित = क् + व् + अ + च् + इ + त् + अ

या तिन्ही शब्दांच्या वर्णरचनेतील पहिल्या वर्णस्तंभात क् हा वर्ण असल्याने दुसऱ्या स्तंभातच तिन्ही शब्दांचे स्थानक्रम अनुक्रमे 'किंचित', 'क्रम', 'क्वचित' असा निश्चित झाल्याने तिसऱ्या स्तंभात जाण्याची आवश्यकता नाही. पण समजा दुसऱ्या स्तंभातही एकच वर्ण आला असता तर मात्र पुढच्या (तिसऱ्या) स्तंभाकडे जावे लागले असते.

उदाहरण चौथे - समान जोडाक्षर असलेल्या तीन शब्दांचा स्थानक्रम विचार :

१. भ्रमनिरास = भ् + र् + अ + म् + अ + न् + इ + र् + आ + स् + अ

२. भ्रमित = भ् + र् + अ + म् + इ + त् + अ

३. भ्रमन्ती = भ् + र् + अ + म् + अ + न् + त् + ई

या शब्दांमध्ये पहिले चार स्तंभ सारख्याच वर्णाचे असल्यामुळे पाचव्या स्तंभातील वर्ण विचारात घ्यावे लागतील. पाचव्या स्तंभातील इ वर्ण हा अ च्या नंतर येत असल्यामुळे भ्रमित हा शब्द तिसऱ्या स्थानक्रमावर येणार हे निश्चित झाले. आता राहिलेल्या दोन शब्दांमध्ये पहिला - दुसरा क्रम लावण्यासाठी सहाव्या स्तंभाचा वर्णक्रम विचारात घ्यावा लागेल. सहाव्या स्तंभामध्ये न् हा सारखाच वर्ण आहे.



अनुक्रमणिका

त्यामुळे सातव्या स्तंभातील वर्ण विचारात घ्यावा लागेल. इ हा वर्ण त् या वर्णाच्या आधी येत असल्यामुळे भ्रमनिरास हा शब्द आधी येईल आणि भ्रमन्ती हा शब्द त्यानंतर येईल. त्यामुळे शब्दांचा स्थानक्रम पुढीलप्रमाणे राहील.

१. भ्रमनिरास

२. भ्रमन्ती

३. भ्रमित

तथापि, या ठिकाणी एक गोष्ट लक्षात घ्यायला हवी की ''भ्रमन्ती'' हा शब्द परसवर्णाचा वापर न करता अनुस्वार देऊन ''भ्रमंती'' असा लिहिला तर या शब्दांचा वर्णक्रम बदलेल.

भ्रमनिरास = भ् + र् + अ + म् + अ + न् + इ + र् + आ + स् + अ

भ्रमंती = भ् + र् + अ + म् + अ + ं + त् + ई

वर्णक्रमामध्ये स्वरादिचिन्ह व्यंजनाच्या आधी येत असल्यामुळे वर्ण पुढीलप्रमाणे राहील :

भ्रमंती

भ्रमनिरास

भ्रमित

**परिशिष्ट पाच**

**देवनागरी अंक आणि त्यांचे प्रमाणीकृत अक्षरी लेखन**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ० | शून्य | १२ | बारा | २४ | चोवीस |
| १ | एक | १३ | तेरा | २५ | पंचवीस |
| २ | दोन | १४ | चौदा | २६ | सव्वीस |
| ३ | तीन | १५ | पंधरा | २७ | सत्तावीस |
| ४ | चार | १६ | सोळा | २८ | अठ्ठावीस |
| ५ | पाच | १७ | सतरा | २९ | एकोणतीस |
| ६ | सहा | १८ | अठरा | ३० | तीस |
| ७ | सात | १९ | एकोणीस | ३१ | एकतीस |
| ८ | आठ | २० | वीस | ३२ | बत्तीस |
| ९ | नऊ | २१ | एकवीस | ३३ | तेहतीस |
| १० | दहा | २२ | बावीस | ३४ | चौतीस |
| ११ | अकरा | २३ | तेवीस | ३५ | पस्तीस |

३६ छत्तीस
३७ सदतीस
३८ अडतीस
३९ एकोणचाळीस
४० चाळीस
४१ एकेचाळीस
४२ बेचाळीस
४३ त्रेचाळीस
४४ चव्वेचाळीस
४५ पंचेचाळीस
४६ शेहेचाळीस
४७ सत्तेचाळीस
४८ अठ्ठेचाळीस
४९ एकोणपन्नास
५० पन्नास
५१ एकावन्न
५२ बावन्न
५३ त्रेपन्न
५४ चोपन्न
५५ पंचावन्न
५६ छप्पन्न
५७ सत्तावन्न
५८ अठ्ठावन्न
५९ एकोणसाठ
६० साठ
६१ एकसष्ट
६२ बासष्ट
६३ त्रेसष्ट
६४ चौसष्ट
६५ पासष्ट
६६ सहासष्ट
६७ सदुसष्ट
६८ अडुसष्ट
६९ एकोणसत्तर
७० सत्तर
७१ एकाहत्तर
७२ बाहत्तर
७३ त्र्याहत्तर
७४ चौऱ्याहत्तर
७५ पंच्याहत्तर
७६ शाहत्तर
७७ सत्त्याहत्तर
७८ अठ्ठ्याहत्तर
७९ एकोणऐंशी
८० ऐंशी
८१ एक्याऐंशी
८२ ब्याऐंशी
८३ त्र्याऐंशी
८४ चौऱ्याऐंशी
८५ पंच्याऐंशी
८६ शाऐंशी
८७ सत्त्याऐंशी
८८ अठ्ठ्याऐंशी
८९ एकोणनव्वद
९० नव्वद
९१ एक्याण्णव
९२ ब्याण्णव
९३ त्र्याण्णव
९४ चौऱ्याण्णव
९५ पंचाण्णव
९६ शहाण्णव
९७ सत्याण्णव
९८ अठ्ठ्याण्णव
९९ नव्याण्णव
१०० शंभर
१००० हजार
१,००,००० लाख
१०,००,००० दहा लाख
१,००,००,००० कोटी
१०,००,००,००० दहा कोटी
१,००,००,००,००० अब्ज

# लेखनविषयक शासन-निर्णयावरील प्रतिक्रिया

**अशोक रा० केळकर**

लेखनविषयक शासननिर्णय २००९ हा 'भाषा आणि जीवन'च्या संपादकांनी आपल्या वाचकांसमोर सविस्तर ठेवण्याचे ठरविले. (हिवाळा २०१०, उन्हाळा २०१० अंक पाहावेत.) याचा हेतू हा की त्यांचे लक्ष वेधावे आणि त्याबद्दल प्रचलित हस्तलेखन, टंकलेखन, मुद्रण, संगणकव्यवहार आणि यांत्रिक संदेशग्रहण करणाऱ्या मंडळींच्या व्यवहारात एकसूत्रीपणा यायला मदत व्हावी. लेखनविषयक चर्चा म्हटले म्हणजे शुद्धलेखनाची चर्चा सामान्यतः आपल्या डोळ्यांसमोर येते. (उदा० कवि की कवी, ब्राह्मण की ब्राम्हण, विसांवा की विसावा). या ठिकाणी मात्र ही चर्चा दृश्य आकारांच्या अधिक मूर्त पातळीवर उतरली आहे. महाराष्ट्र शासनाने आपले पूर्वीचे १९६२ व १९६६चे निर्णय 'अधिक्रमित' करून नवा निर्णय प्रसृत केला आहे आणि तोही नव्या तंत्रविद्येमुळे एकसूत्रीपणाची निकड वाढत जाणार हे लक्षात घेऊन, ही समाधानाची गोष्ट आहे.

मराठी भाषेचे लेखन आणि उच्चारण आणि त्यात होत जाणारे बदल यांचा एक अभ्यासक या नात्याने माझी या निर्णयाची प्रतिक्रिया नोंदवणे अगत्याचे आहे असे मला वाटते म्हणून हा लेखनप्रपंच.

विशिष्ट तपशिलांची चर्चा करण्याअगोदर त्यामागच्या सर्वसाधारण धोरणाचा विचार करणे योग्य होईल. प्रचलित व्यवहार आणि त्याच्या गरजा लक्षात घेणे, त्यासाठी केवळ शाळेत शिकवल्या जाणाऱ्या अक्षरांचा विचार न करता वर्णांचा विचार करणे (नुसत्या अंगभूत अशा सामावून घेणाऱ्या क, ख... अक्षरांच्या बरोबर क्, ख्.... हे व्यंजनवर्ण, त्यांची जोडाक्षरातली क, ्र... ही व्यंजनरूपे, ा, ि... ही स्वरचिन्हे) हे धोरण दिसते. याच धोरणाला अनुसरून एक समावेशकता या निर्णयात दिसते. (ॲ, ऑ यांचा वर्णमालेत समावेश, अक्षरांबरोबर आकडे आणि त्यांचे 'अक्षरी' लेखन, वर्णक्रमाचे संकेत, विरामचिन्हांचा लेखनव्यवस्थेत समावेश). परंपरेचा सादर राखणे पण त्यामुळे होणाऱ्या गैरसोयी टाळणे (ख अक्षराचे दोन अवयव जोडून घेणे, श्री, क्ष, ज्ञ यांचा स्वीकार), देवनागरीची आणि तिच्या 'मराठी' वळणाच्या वैशिष्ट्यांची बूज राखणे (अ ची बाराखडी, अि, अी, अु, अे... उर्दू लिपीतील आलिफला जेरसारखी स्वरचिन्हे जोडणारा पर्याय आणि श ऐवजी श किंवा ल ऐवजी ल हिंदी वळणाची आठवण देणारा पर्याय या

दोहोंनाही शासकीय निर्णयात स्वीकारण्यात आलेले नाही. ही सगळी धोरणे मला पटण्यासारखी वाटतात.

तपशिलात जाताना सामान्य जिज्ञासूची भूक भागवण्याचा कुठे प्रयत्न दिसतो तो स्तुत्य वाटतो. उदाहरणार्थ, जोडाक्षरांची चर्चा करताना कधी मूळ व्यंजनाच्या आकाराबरोबर येणारा सुटा दंड ('ग' मधला). मधोमध येणारा दंड ('क' मधला), शिरोभागी आखूड दंड ('छ' मधला) यांच्याकडे लक्ष वेधले आहे, कधी जुन्या पूर्णाक्षरांची आठवण काढली आहे. उदाहरणार्थ, र च्या जागी ्र (ग्र, ड्र), श च्या जागी श्र (श्र, श्व, पुऱ्या) मात्र, क च्या जागी क (क्त मधला) आणि त च्या जागी ट (त्र, त्त) यांची आठवण करून द्यायची राहिली आहे. वर्णक्रम देताना तो इंग्रजी ए, बी किंवा उर्दू आलिफ, बे प्रमाणे केवळ सांकेतिक किंवा दृश्य रूपांच्या सारखेपणावर आधारलेला (उर्दू बे, पे, ते प्रमाण), मराठीमध्ये बालांना किंवा प्रौढांना साक्षर बनवताना वापरला जाणारा ग, म, भ, न हा क्रम) असा नाही. तो उच्चाराची कंठ, तालू इत्यादी स्थाने आणि मुखविवर म्हणजे जबड्याचे कमी-अधिक उघडणे (इ ए, अ आ; उ ओ, य र ल व आणि श, ष, स, हे गट; स्वर, स्पर्श-व्यंजने, आणि या दोन गटांचा मधला गट (थोडेसे स्वरांकडे झुकणारे य, र, ल, व हे ईषद्विवृत आणि श, ष, स, ह, ळ हे ईषद्विवृत हे स्पर्शव्यंजनांकडे झुकणारे ही वर्णमालेची/अक्षरमालेची एकंदर मांडणी हे सर्व लक्षात घेता ॲ ला अ शी आणि ऑ ला आ शी जोडणे, निव्वळ ग म भ न च्या पातळीवर जाईल, शासनाची ए, ॲ आणि ओ ऑ ही मुखविवरावर म्हणजे जबंडा कमीअधिक उघडण्यावर आधारलेली मांडणी पारंपरिक वर्णक्रमाच्या जवळ जाणारी राहील - हे सांगायचे राहून गेले नाही.

वर्णमाला आणि अक्षरमाला यांना स्पष्ट वेगळे काढून त्यांना अनुक्रमे शास्त्रीय पातळी आणि शालेय पातळी यांच्याशी जोडणे हा विवेक स्वागतार्ह आहे. चिन्हांच्या गटांना पारिभाषिक संज्ञा अधिक आखीवरेखीव करण्याचा उपक्रम स्वागतार्ह आहे तो अधिक पुढे नेता येण्यासारखा आहे. एकाच दृश्य रूपाला एकाधिक कार्ये हा विवेक बाळगणे हिताचे होईल. शिरोबिंदू एकच पण कार्ये अनुस्वार (शंख, चंची, तंटा, तंत्र, पंप, संयम, संरक्षण, संलग्न किंवा संशय, दंष्ट्रा, सिंह मधले ङ्, न्, ण्, न्, म्, ञ्, वँ, वँ् किंवा अनुनासिक लँ्, वँ्, वे्, वँ्, वँ्, वँ्, हे वर्ण) अनुनासिक (ऐंशी, ब्यांयशी मधला). द्विबिंदू एकत्र कार्ये विसर्ग हा वर्ण, अपूर्ण विराम हे कार्य, त्रिबिंदू एकच रूप पण खंडविराम. शब्दलोप ही कार्ये. द्विखंड ऽ एकच पण कार्ये अक्षरलोप प्लुती. याच्या उलट कार्य एकच पण दृश्य रूपे





अनुक्रमणिका

अनेक. यथोपरिकार्य एकच. पण '', -. लोप हे कार्य एकच पण दृश्य रूपे अण्णासाो, '८३ किंवा, 'नगर, °घोडा, डी., °डे. संक्षेप हे कार्य आणि दृश्यरूपे स. न., स० न०

काही नियम अनाठायी वाटतात. उदा० उद्गार किंवा उद्‌गार चालेल, पण उद्‌गीरची लढाई चालणार नाही. हायफन आणि डॅश साठी काही हस्तलेखक फरक करीत नाहीत. त्याची मुद्रणावर छाया पडते. संयोग-चिन्ह आणि वियोग-चिन्ह या संज्ञा पुरेशा पारदर्शी आहेत. अपसरण (दूर सारणे) आणि अपसारण (दूर सारणे) या संज्ञा पुरेशा परिचयसुलभ नाहीत हीसुद्धा त्यातली एक अडचण ठरू शकेल. रु आणि रू यात हस्तलेखन, मुद्रण, टंकलेखन यात नित्य दोन्हीऐवजी रु येतो. त्यासाठी काही दिवस रु, रू हे पर्याय चालू द्यायला काय हरकत आहे? अर्धा ळ, पाऊण च, शिरोरेफ ``, मध्यरेफ = अधोरेफ ‸, पाऊण रेफ ्र यांसारख्या काही नव्याजुन्या पारिभाषिक संज्ञा म्हणून रूढ करता येतील. टंकनामध्ये मध्यरेफच्या ऐवजी चुकीने संयोग-चिन्ह येते, कऱ्हेचे पाणीऐवजी क-हेचे पाणी. ऋ स्वराची दोन दृश्यरूपे ऋ ऋ अशी आहेत, त्यातले दुसरे हिंदी वळणाचे आणि दीर्घ ॠ वाटू शकणारे आहे ते टाळावे. शिरोबिंदू, शिरोरेफ, डावी व उजवी वेलांटी अर्धचंद्र यांचा टकरी शिरोरेखेच्या वर होण्याची भीती असते. त्या टाळण्याच्या युक्त्या असतात. उदा० अंटार्क्टिका खंड यातील पसरट डावी वेलांटी मुद्रकाला जमली नाही तर अंटार्कृटिका असे काही करावे लागते. **भाषा आणि जीवन**मधल्या शंका या सदरासाठी इच्छुकांनी अवश्य लिहावे. समाधान यथाशक्ती मिळावे.

मी या सर्व प्रकारणी बरीच वर्षे काम करून लेखन करीत आहे. मी आपल्या प्रतिक्रिया नोंदताना जरूर तितकी उदाहरणे आणि साधकबाधक मुद्दे दिलेले आहेत. जिज्ञासूंनी खाली दिलेल्या संदर्भसूचीवरून शोध घ्यावा.


⁕ मराठी देवनागरी वर्णक्रमी : एक टिपण - महाराष्ट्र साहित्य पत्रिका, अंक २०२ : ६०-४, १९७७ : समावेश, वैखरी : भाषा आणि भाषाव्यवहार, मॅजेस्टिक; मुंबई १९८३, दुसरी आवृत्ती : स्नेहवर्धन, पुणे, २००७

⁕ मराठीचे श्रवणप्रत्ययी लेखन, मराठी संशोधन पत्रिका २५:२, ३१-४६, समावेश : मराठी संशोधन पुस्तिका ११, १९७८ : वैखरी १९८३; दुसरी आवृत्ती २००७

⁕ मराठीमधील विशेषनामांचे उच्चारण व लेखन (शब्दवेध), मसापत्रिका १७६-७:१२३-७, १९७१. वैखरी १९८०, दुसरी आवृत्ती २००७

※ मराठी लेखनातील विरामचिन्हांचा उपयोग, भाषा आणि जीवन समावेश : मध्यमा, मेहता पुणे, १९९६! ७:४, ६-३५ : दिवाळी १९८९. इंग्लिश : Deccan College bulletin 50, 1990, (यात विरामचिन्हांबरोबर ※+ सारखी संदर्भचिन्हे, पायमोड, द्विखंड सारखी भेदकचिन्हे, शब्दांची तोड-जोड परिच्छेद सारखे मांडणीचे (Layout) विशेष यांचाही विचार केला आहे.)

※ मराठी भाषा आणि वाचिक अभिनय, नवभारत : दिवाळी १९९२. समावेश : मध्यमा, मेहता, पुणे, १९९६ इंग्लिश : Deccan College bulletin 51-2, 1991-2, (यात शब्दांपेक्षा मोठ्या घटकांची चर्चा आहे.)

मूळ शासकीय निर्णय काय किंवा माझ्या आतापर्यंत दिलेल्या प्रतिक्रिया काय यांचा प्रचलित अराजकसदृश व्यवहारावर काही थोडा परिणाम व्हायचा असेल तर लोकशिक्षण आणि शालेय शिक्षण यांच्याद्वारे त्यांचा पाठपुरावा केला गेला पाहिजे.

■

धनंजय, 759/83 भांडारकर रस्ता, पुणे 411 004
दूरभाष : (020) 2565 4901

प्रतिक्रिया २

## जोडाक्षरलेखन

कृ०श्री० अर्जुनवाडकर

संदर्भ - हिवाळा २०१० अंक : शासनसंमत मराठी वर्णमाला

उक्त लेखननियमांत पुढील अक्षरांची शिफारस आढळते : सख्खा (पृ० ७६), पुठ्ठा, बुद्धा (पृ० ८०). हे लेखन अन्य सदृश अक्षरांच्या लेखनाशी विसंगत आहे. उदा० बुद्धी (पृ० ७८) : हा शब्द 'सख्खा' शब्दानुसार 'बुध्धी' असा लिहावा लागेल. अल्पप्राण व्यंजन (क्, ग्, च्, ज्...) आणि महाप्राण व्यंजन (ख्, घ्, छ्, झ्....) यांच्या संयोगाक्षरांत सर्वत्र असेच लेखन करण्याचा प्रसंग येईल. (स्वछ्छ, उथ्थान, शुध्ध, ...)

वस्तुतः महाप्राण व्यंजनाचे द्वित्व करण्याच्या प्रसंगी पहिला घटक उचारतः अल्पप्राण होतो. रूढ लेखन तदनुसार आहे. शासनसंमत लेखनात विवाद्य जोडाक्षरे (ख्ख, ठ्ठ, द्ध) अन्य सदृश जोडाक्षरांशी विसंगत आहेत.

■

११९२ शुक्रवार पेठ, पुणे ४११ ००२



अनुक्रमणिका

# सांस्कृतिक धोरणाच्या मसुद्यातील भाषा आणि साहित्य

(महाराष्ट्र शासनाच्या सांस्कृतिक धोरणाची रूपरेषा तयार करण्यासाठी शासनाने सहा महिन्यांपूर्वी एक समिती नेमली होती. या समितीत पुढील मान्यवरांचा समावेश होता – डॉ० आ०ह० साळुंखे (अध्यक्ष), प्रा० दत्ता भगत (उपाध्यक्ष), डॉ० अरुण टिकेकर, श्री० उल्हास पवार, श्री० अशोक नायगावकर, श्रीमती सिसिलिया कार्व्हालो, श्री० गिरीश गांधी, श्री० वि०वि० करमरकर, श्री० शफाअत खान, श्री० हृदयनाथ मंगेशकर, श्री० मधुर भांडारकर, श्री० अजय अंबेकर (सदस्य-सचिव), यांपैकी श्री० मधुर भांडारकर एकाही बैठकीला उपस्थित राहू शकले नाहीत, तर श्री० हृदयनाथ मंगेशकर एकाच बैठकीला हजर राहू शकले. समितीने शासनाला सादर केलेल्या मसुद्यात ११ भाग व दोन परिशिष्टे आहेत. मसुद्याच्या चौथ्या भागात भाषा आणि साहित्य यांचा समावेश असून 'भाषा आणि जीवन'च्या वाचकांच्या सोयीसाठी तो भाग आणि त्यात उल्लेखिलेली दोन परिशिष्टे पुढे देत आहोत. या मसुद्यांसंबंधीच्या आपल्या प्रतिक्रिया वाचकांनी थेटपणे शासनाकडेच पाठवाव्यात. – संपादक)

### ४. भाषा आणि साहित्य

ज्ञानाचे संचयन आणि संक्रमण स्थलकालांच्या मर्यादा ओलांडू शकते, ते प्रामुख्याने भाषेमुळेच होय. संगीतनृत्यांपासून ते चित्रशिल्पांपर्यंत नानाविध कलांना अधिक आस्वाद्य बनविण्याचे कार्यही भाषा नक्कीच करते. ती एकीकडे व्याकरणाच्या आणि लेखनपद्धतीच्या नियमांचा मानही राखते आणि दुसरीकडे काळाच्या ओघात त्या नियमांच्या संहितेला वेगळे वळण देऊन आशयाला सतत ताजेपणाही देत राहते. ती ललित साहित्यापासून ते गंभीर विवेचनापर्यंत विविध मार्गांनी अंतर्बाह्य सृष्टीला अभिव्यक्त करते. भाषेचे हे अंगभूत सामर्थ्य ओळखून मराठी भाषेला अधिक विकसित करणे आवश्यक आहे. शब्दसृष्टी आणि साहित्य यांच्या बाबतीत पूर्वीपासूनच समृद्ध असलेली मराठी भाषा आधुनिक काळाची आव्हाने पेलण्यासाठी सर्व अंगांनी सतत विकास पावत संपन्न अशी ज्ञानभाषा व्हायला हवी. मराठी भाषा आणि देशातील व विदेशांतील भाषा यांच्यामध्ये परस्पर साहित्य-व्यवहार वृद्धिंगत झाल्यास मराठीची समृद्धी होण्याबरोबरच महाराष्ट्राची संस्कृती सर्वदूर पोहचण्यास मदत होईल. शिवाय, आशयाच्या

संपन्नतेबरोबरच मराठीची लेखनपद्धती तर्कशुद्ध, सुलभ आणि गतिमान करणेही गरजेचे झाले आहे. या सर्व बाबी ध्यानात घेऊन शासन मराठी भाषा व साहित्य यांच्या विकासासाठी विविध उपक्रम अमलात आणेल.

## लोकसंस्कृती

१. लोकसाहित्य समिती - लोकसाहित्याचे संकलन व प्रकाशन करण्यासाठी कार्यरत असलेल्या लोकसाहित्य समितीला अधिक आर्थिक तरतूद उपलब्ध करून देण्यात येईल. तसेच या समितीचे कार्य अधिक व्यापक करण्यात येईल.

२. आदिवासी कोश - महाराष्ट्रातील आदिवासींचा सामाजिक-सांस्कृतिक-मानववंशशास्त्रीय दृष्ट्या समग्र अभ्यास करून त्याचा कोश तयार करण्यात येईल. यासाठी वेगळे स्वतंत्र मंडळ नेमण्यात येईल अथवा हे कार्य पुणेस्थित आदिवासी संशोधन व प्रशिक्षण केंद्राकडे किंवा अशा प्रकारच्या संशोधनाचे कार्य करणाऱ्या मान्यताप्राप्त संस्थांकडे / विद्यापीठांकडे सोपविण्यात येईल.

३. जाती-जमाती कोश - महाराष्ट्रातील विविध जातींचा आणि आदिवासींखेरीज इतर जमातींचा सामाजिक-सांस्कृतिक-मानववंशशास्त्रीय दृष्ट्या समग्र अभ्यास करून त्याचा कोश तयार करण्यात येईल. यासाठी वेगळे स्वतंत्र मंडळ नेमण्यात येईल अथवा 'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळा'कडे हे काम सोपविण्यात येईल किंवा अशा प्रकारच्या संशोधनाचे कार्य करणाऱ्या मान्यताप्राप्त संस्थांकडे / विद्यापीठांकडे हे कार्य सोपविण्यात येईल.

४. ग्रामीण जीवन कोश - शेती व तत्संबंधित पारंपरिक ग्रामीण जीवनाशी व व्यवसायांशी तसेच अन्य कारागिरांच्या व्यवसायांशी निगडित अनेक संज्ञा, संकल्पना आणि वस्तू काळाच्या ओघात लोप पावत चालल्या आहेत. अशा संज्ञा व संकल्पना यांचा सचित्र स्वरूपातील कोश तयार करण्यासाठी प्रकल्प राबविण्यात येईल. हे कार्य 'लोकसाहित्य समिती' वा तत्सम संस्था यांच्याकडे सोपविण्यात येईल.

५. स्थित्यंतरांचा इतिहास - एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापासून आतापर्यंत महाराष्ट्रात झालेल्या सामाजिक-सांस्कृतिक स्थित्यंतरांचा इतिहास लिहिण्यात येईल. 'राज्य साहित्य संस्कृती मंडळा'मार्फत हा प्रकल्प राबविण्यात येईल.

६. फुले-शाहू-आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन मंडळ - महात्मा फुले,





अनुक्रमणिका

राजर्षी शाहू महाराज आणि डॉ० बाबासाहेब आंबेडकर यांचे चरित्र, कार्य आणि लेखन यांबाबतची सामग्री प्रकाशित करण्यासाठी सध्या अस्थायी स्वरूपात तीन समित्या कार्यरत् आहेत. या तिन्ही महामानवांच्या कार्यांत व विचारांत एकवाक्यता आहे. म्हणून तिन्ही समित्यांच्या कार्यात समन्वय असणे व्यवहार्य ठरेल. शिवाय, या समित्यांचे कार्य अधिक गतिमान करणे, या कार्यात एकसूत्रता आणणे आणि त्यासाठी स्वतंत्र आर्थिक तरतुदीसह व्यापक स्वरूपाची स्वतंत्र व स्थायी प्रशासकीय व्यवस्था उपलब्ध करून देणे आवश्यक आहे. यासाठी 'फुले-शाहू-आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन मंडळ' स्थापन करण्यात येईल. या मंडळाच्या तीन समित्या मंडळाच्या अंतर्गत पण स्वतंत्रपणे कार्य करतील. त्यासाठी दरवर्षी गरजेनुसार स्वतंत्र आर्थिक तरतूद करण्यात येईल.

७. सण कोश - राज्यामध्ये वर्षभरात विविध सण साजरे केले जातात. काही सणांना विशिष्ट गाव, शहर, प्रादेशिक विभाग इ० ठिकाणचे स्थानिक वेगळेपण व महत्त्व असते. एकच सण वेगवेगळ्या ठिकाणी व वेगवेगळ्या नावाने साजरा केला जातो, असेही घडते. हे सण हा सांस्कृतिक जीवनाचा महत्त्वाचा घटक आहे. म्हणून अशा सणांची माहिती कोशरूपाने प्रकाशित केली जाईल. हे कार्य 'लोकसाहित्य समिती'कडे सोपविले जाईल.

८. जत्रा आदींचे माहिती प्रकाशन - राज्यात गावोगाव विविध जत्रा, यात्रा, मेळे, उरूस, शीख समाजाचा हल्लाबोल, फेस्ता, फेअर इत्यादींचे आयोजन केले जात असते. या आयोजनांच्या प्रसंगी वैशिष्ट्यपूर्ण असे अनेक सांस्कृतिक उपक्रम राबविले जातात. अशा प्रकारचे उपक्रम हे महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनाचे एक महत्त्वाचे अंग आहे. अशा जत्रा आदींचा परिचय करून देणाऱ्या जिल्हावार माहिती-पुस्तिका प्रसिद्ध करण्यात येतील. या पुस्तिकांच्या आधारे त्यांचा राज्य पातळीवरील कोश तयार करण्यात येईल. हे कार्य 'लोकसाहित्य समिती'कडे सोपविले जाईल.

९. जाती-जमाती भाषा कोश/संशोधन - महाराष्ट्रातील ज्या जाती-जमातींच्या मातृभाषा प्रमाण-मराठीपेक्षा, मराठी बोलींपेक्षा अथवा हिंदी, गुजराती, कन्नड, तेलुगु इत्यादी आधुनिक / अभिजात भाषांपेक्षा वेगळ्या आहेत, त्यांच्या भाषांसाठी लिपी निश्चित करणे, कोश तयार करणे, तसेच त्यांचे मौखिक व लिखित साहित्य, रूढी, मिथके इत्यादींचे अध्ययन/संशोधन करणे इत्यादी उद्देशांनी कार्य करणाऱ्या व्यक्तींना / संस्थांना अर्थसाहाय्य दिले जाईल.

१०. अन्य साहित्य संमेलने अनुदान - मुख्य मानल्या गेलेल्या प्रवाहापेक्षा वेगळ्या प्रवाहातील जनसमूहांच्या आणि उपेक्षित वर्गांच्या मराठी साहित्य संमेलनांनाही त्या-त्या संमेलनाच्या एकंदर स्वरूपावर आधारित अनुदान देण्यात येईल. 'राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ' या संदर्भात प्रस्ताव तयार करील.

११. ग्रामीण विद्यार्थी मार्गदर्शन - ग्रामीण भागांतून येणाऱ्या विद्यार्थ्यांना शहरी भागात वावरताना भेडसावणाऱ्या समस्यांची माहिती देणारे आणि त्या समस्यांवर मात करण्याविषयी, तसेच त्या विद्यार्थ्यांच्या अंगभूत क्षमतांचा विकास आणि गुणवत्तेचा आविष्कार करण्याविषयी मार्गदर्शन करणारे प्रशिक्षण आवश्यक असते. शैक्षणिक वर्षाच्या प्रारंभी अशा प्रशिक्षणाची व्यवस्था करण्याविषयी शैक्षणिक संस्थांना सांगण्यात येईल.

१२. अप्रयोगार्ह शब्दसूची - पूर्वी प्रचलित असलेले काही शब्द, वाक्प्रचार, म्हणी वगैरेंची प्रयोगार्हता आता वेगवेगळ्या कारणांनी कालबाह्य झाली आहे. आपले सार्वजनिक जीवन न्यायाधिष्ठित, संघर्षरहित, निकोप व अभिरुचिसंपन्न ठेवण्याच्या दृष्टीने असे वाक्प्रयोग टाळता यावेत म्हणून शिक्षक, पत्रकार, साहित्यिक, कलावंत, राजकीय नेते वगैरेंना अशा शब्दांची माहिती असणे आवश्यक आहे. त्यासाठी अशा शब्दांची सूची तयार करण्यात येईल. 'यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी' सारख्या ('यशदा'सारख्या) संस्थेमार्फत अशी सूची तयार करण्यात येईल. इतिहास, समाजशास्त्र, भाषाशास्त्र इत्यादी स्वरूपाच्या लेखनामध्ये अशा शब्दांचा निर्देश करणे अपरिहार्य असल्यास तो निर्देश अपवाद म्हणून आणि निकोप हेतूने केला जावा, अशी अपेक्षा असेल. अप्रयोगार्ह शब्दांची काही उदाहरणे परिशिष्ट क्र० २ मध्ये दिली आहेत.

## ग्रंथसंस्कृती

१. कोश-आवृत्त्या - विषयवार परिभाषा कोशांच्या सुधारित व संवर्धित आवृत्त्या प्रकाशित करण्यात येतील आणि त्या मराठी भाषकांना सहज प्राप्त होतील, अशी व्यवस्था करण्यात येईल. सर्व अनुदानित सार्वजनिक ग्रंथालयांना तसेच शाळा/ महाविद्यालये/ विद्यापीठे यांना हे कोश विकत घेणे बंधनकारक करण्यात येईल.

२. विश्वकोश प्रकल्पाला चालना -

२.१ विश्वकोशाचे जे नियोजित खंड अद्याप प्रकाशित झालेले नाहीत, ते लवकरच प्रकाशित केले जातील.





अनुक्रमणिका

२.२ विश्वकोश मंडळाचे सर्व खंड युनिकोडमध्ये टंकलिखित करून संकेतस्थळावर (वेबसाईटवर) उपलब्ध करून देण्यात येतील. विश्वकोशातील माहिती अद्ययावत करण्यासाठी सूचना करण्याची अभ्यासकांना मुभा असेल. पण ही माहिती विश्वकोश मंडळाने मंजूर केल्यानंतरच अधिकृत स्वरूपात समाविष्ट केली जाईल.

२.३ पूर्वी प्रकाशित झालेल्या खंडांच्या नव्या आवृत्त्या तयार करताना त्यांच्यामध्ये नव्याने समाविष्ट करावयाच्या नोंदींची सूची करण्यासाठी योग्य ती यंत्रणा निर्माण करण्यात येईल.

२.४ विश्वकोश निर्मिती मंडळासाठी लेखन करणाऱ्या लेखकांच्या /अभ्यागत संपादकांच्या/करारपद्धतीवरील कर्मचाऱ्यांच्या मानधनात वाढ करण्यात येईल. नोंदीचे काम तसेच प्रशासकीय काम करारपद्धतीने करून घेण्याची मंडळाला मुभा असेल. तसेच, आवश्यक असणारी व रिक्त असलेली स्थायी पदे त्वरित भरण्यात येतील. या सर्व बाबींसाठी शासन विश्वकोशाला भरीव स्वरूपात आर्थिक तरतूद उपलब्ध करून देईल.

३. मराठी शब्द व्युत्पत्ती कोश - अनेकदा शब्दांमध्ये सामाजिक / सांस्कृतिक इतिहास अप्रकट स्वरूपात पिढ्यानूपिढ्या टिकून राहिलेला असतो. अलीकडच्या काळात मराठीमध्ये विविध मार्गांनी अनेक शब्दांची भर पडली आहे. तसेच, भाषाशास्त्र, व्युत्पत्तिशास्त्र इ० क्षेत्रांत झालेल्या संशोधनामुळे शब्दांच्या नव्या व्युत्पत्ती समोर येऊ लागल्या आहेत. समाजातील ज्या घटकांच्या बोलींकडे पूर्वी फारसे लक्ष जात नव्हते, अशा घटकांच्या बोलींमधील शब्दांच्या व्युत्पत्तींचा शोध घेण्याचीही गरज निर्माण झाली आहे. या सर्व बाबी लक्षात घेऊन मराठी भाषेतील शब्दांच्या व्युत्पत्ती देणारा एक अद्ययावत असा 'मराठी शब्द व्युत्पत्ती कोश' तयार करण्यात येईल. त्यासाठी एक मंडळ नेमून 'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळा'मार्फत ही कार्यवाही करण्यात येईल.

४. दुर्मिळ ग्रंथ संचयिका - महाराष्ट्रातील संस्थांना / सार्वजनिक ग्रंथालयांना ३१ डिसेंबर १९०० या दिवशी अथवा त्यापूर्वी प्रकाशित झालेले ग्रंथ ग्रंथालय संचालनालयाच्या संमतीशिवाय निकालात काढता येणार नाहीत. जे ग्रंथ विशिष्ट कारणाने महत्त्वपूर्ण असतील, ते ग्रंथ निकालात काढण्याची परवानगी देण्यात येणार नाही. त्या ग्रंथांचे जतन करण्यासाठी 'दुर्मिळ' ग्रंथ संचयिका' स्थापन करण्यात येईल. ही कार्यवाही करण्यासाठी ग्रंथालय संचालनालय तज्ज्ञांची समिती नेमेल.

५. दुर्मिळ ग्रंथ सूची - महाराष्ट्रात शंभर वर्षांपूर्वी स्थापन झालेली सुमारे सव्वाशे ग्रंथालये आहेत. या ग्रंथालयांमध्ये आणि इतरही काही ग्रंथालयांमध्ये १ जानेवारी १९०१ पूर्वी प्रकाशित झालेली अनेक पुस्तके आहेत. या ग्रंथालयांकडे / व्यक्तिगत संग्रहांमध्ये असलेल्या अशा पुस्तकांचे तपशील मागवून घेण्यात येतील. महाराष्ट्राच्या बाहेर मराठी भाषकांनी उभारलेली ग्रंथालये व इतर संस्था यांच्याकडे अशी पुस्तके उपलब्ध असतील, तर त्यांचाही तपशील मागवून घेण्यात येईल. ग्रंथालय संचालनालयामार्फत अशा ग्रंथांची सूची संशोधकांसाठी प्रसिद्ध करण्यात येईल.

६. दुर्मिळ मराठी ग्रंथ संकेतस्थळावर - स्वामित्व अधिकाराची मुदत संपलेले अनेक मराठी ग्रंथ सध्या उपलब्ध होत नाहीत. अशा दुर्मीळ आणि महत्त्वाच्या ग्रंथांची सूची महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळामार्फत तयार करण्यात येईल. हे ग्रंथ स्वतंत्र संकेतस्थळावर सहज उपलब्ध होतील, अशी व्यवस्था करण्यात येईल.

७. शासकीय प्रकाशने, छपाई व विक्री - 'राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ', 'विश्वकोश निर्मिती मंडळ', 'भाषा संचालनालय', 'राज्य मराठी विकास संस्था' यांना तसेच ग्रंथ प्रकाशित करणाऱ्या राज्य शासनाच्या कोणत्याही इतर यंत्रणेला सध्या शासकीय मुद्रणालयामधूनच ग्रंथ छापून घेण्याचे आणि या ग्रंथांची विक्री शासकीय ग्रंथविक्री भांडाराद्वारेच करण्याचे बंधन आहे. यामुळे या ग्रंथांची आवश्यक तेव्हा छपाई करून मिळत नाही तसेच, जनतेला हे ग्रंथ सुलभतेने मिळत नाहीत. या सर्व संस्थांना आपले ग्रंथ खाजगीरित्या छापून घेण्याची आणि त्यांच्या विक्रीसाठी स्वतःची यंत्रणा उभारण्याची मुभा असेल.

८. शासकीय ग्रंथ पुनर्निर्मिती - 'राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ', 'विश्वकोश निर्मिती मंडळ', 'भाषा संचालनालय', 'राज्य मराठी विकास संस्था' व अन्य शासकीय संस्था यांनी प्रकाशित केलेल्या ग्रंथांची पुनर्निर्मिती करण्याचे अधिकार या संस्थांना असतील. या संस्था अशा ग्रंथांची पुनर्निर्मिती करणार नसतील आणि लोकांकडून अशा ग्रंथांची मागणी असेल, तर या संस्था हे ग्रंथ खाजगी प्रकाशकांना प्रकाशित करण्यासाठी देऊ शकतील.

९. ग्रंथांची शासकीय खरेदी - महाराष्ट्रात प्रकाशित होणाऱ्या पुस्तकांच्या खरेदीसाठी ग्रंथालय संचालनालय राज्यातील ग्रंथालयांना अनुदान देते, त्याचप्रमाणे स्वतः ग्रंथ खरेदी करून ते ग्रंथालयांना वितरित करते.

त्यासाठी ग्रंथ निवड समिती नियुक्त करण्यात येते. या निवड समितीच्या रचनेत आवश्यकतेनुसार सुधारणा करण्यात येईल. मान्यताप्राप्त ग्रंथालयांना परिरक्षण अनुदान देण्यात येते, त्यातून ५० टक्के खर्च वेतनावर व ५० टक्के खर्च वाचनसाहित्यासह वेतनेतर बाबींवर करण्यात येतो. या अनुदानाच्या रकमेत दरवर्षी ५ टक्के वाढ करण्यात येईल.

१०. ग्रंथोत्सव - राज्याच्या प्रत्येक जिल्ह्यात दरवर्षी ग्रंथोत्सव आयोजित करण्यात येईल. स्थानिक साहित्य संस्था आणि शैक्षणिक संस्था यांच्या सहकार्याने जिल्हाधिकारी ग्रंथोत्सवाचे आयोजन करतील. प्रकाशक आणि ग्रंथविक्रेते यांना ग्रंथविक्रीसाठी आणि ग्रंथप्रेमींना एकाच ठिकाणी विविध ग्रंथ प्राप्त व्हावेत यासाठी आवश्यक सुविधा उपलब्ध करून देणे, हा या आयोजनाचा मुख्य उद्देश असेल. शिवाय, या ग्रंथोत्सवाच्या अंतर्गत साहित्यविषयक उपक्रमही आयोजित करण्यात येतील. 'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळा'मार्फत जिल्हाधिकाऱ्यांना अनुदान देण्यात येईल. महाराष्ट्राबाहेरील महत्त्वाच्या शहरांमध्येही मंडळ स्वतः अशा उपक्रमांचे आयोजन करील.

११. ग्रंथसंस्कृती जोपासना - राज्यात ग्रंथसंस्कृती वृद्धिंगत करण्याचे प्रयत्न केले जातील. महिन्यातून एकदोनदा एकत्र जमून ग्रंथचर्चा, ग्रंथसमीक्षण, साहित्यविषयक चर्चा इ. उपक्रम राबविणाऱ्या संस्थांना राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळामार्फत प्रोत्साहनपर अनुदान देण्यात येईल. राज्यात अशा संस्थांचे एक जाळेच निर्माण व्हावे, असे प्रयत्न केले जातील.

१२. वाङ्मय पुरस्कार निवड सुधारणा - राज्य शासनाच्या वतीने दिल्या जाणाऱ्या वाङ्मय पुरस्कारांसाठीच्या सध्याच्या निवडप्रक्रियेनुसार निवड समितीच्या अध्यक्षांच्या सल्ल्याने प्रत्येक लेखनप्रकारासाठी एक परीक्षक म्हणून नेमला जातो आणि हा परीक्षक त्या लेखनप्रकारातील उत्कृष्ट पुस्तकांची निवड करतो. या निवडी त्या लेखनप्रकारासाठी परीक्षक नेमलेल्या एका व्यक्तीच्या दृष्टिकोनापुरत्या मर्यादित राहू नयेत, म्हणून निवड समितीच्या अध्यक्षांसह समितीतील अन्य ५ ते ६ परीक्षकांनी सर्व पुरस्कारांची अंतिम निवड करावी, याकरिता निवडप्रक्रियेत सुधारणा करण्यात येईल.

१३. इंग्रजी भाषेतील ग्रंथांना पुरस्कार - मराठी मातृभाषा असलेल्या व्यक्तींनी इंग्रजीमध्ये स्वतंत्र्यरित्या लिहिलेल्या उत्कृष्ट ग्रंथांना वाङ्मय पुरस्कार देण्यात येतील. जागतिक स्तरावर इंग्रजी भाषेतील ग्रंथव्यवहाराचे वाढलेले प्रमाण लक्षात घेऊन हा उपक्रम राबविण्यात येईल.

१४. भारतीय भाषांतील ग्रंथांना पुरस्कार - मराठी मातृभाषा असलेल्या व्यक्तींनी इंग्रजीखेरीज अन्य भारतीय भाषांमध्ये स्वतंत्ररित्या लिहिलेल्या सर्जनशील व वैचारिक उत्कृष्ट ग्रंथांना वाङ्मय पुरस्कार देण्यात येतील.

१५. अमराठी लेखकाला पुरस्कार - मराठीपेक्षा वेगळी मातृभाषा असलेल्या देशी / परदेशी लेखकांनी / संशोधकांनी मराठीत किंवा महाराष्ट्रविषयक लिहिलेल्या उत्कृष्ट ग्रंथांना वाङ्मय पुरस्कार देण्यात येतील.

१६. 'महाराष्ट्र' वार्षिकी - केंद्र शासनाच्या 'इंडिया' या वार्षिकीच्या धर्तीवर महाराष्ट्र शासनाच्या विविध विभागांचा आढावा घेणारी वार्षिकी दरवर्षी प्रकाशित करण्यात येईल. या वार्षिकीत शासनाच्या विभागांशी संबंधित मूलभूत आकडेवारी आणि महत्त्वाच्या योजना यांची माहिती देण्यात येईल. त्याशिवाय जिल्हावार पुस्तिका नियमितपणे प्रकाशित करण्यात येतील.

१७. 'लोकराज्य' - प्रादेशिक विभागांचा आढावा - 'लोकराज्य' या मासिकाचे स्वरूप महाराष्ट्राचे विविध विभाग, समाजाचे विविध स्तर, सामाजिक-सांस्कृतिक जीवनाची विविध क्षेत्रे इत्यादी अंगांनी सर्वसमावेशक करण्यात येईल. या मासिकात महाराष्ट्राच्या विविध भागांतील घडामोडींचा आणि घटनांचा विभागवार आढावा घेण्यात येईल. सर्व प्रादेशिक विभागांतील वाचकांना सर्व विभागांचा आढावा वाचता येईल, या पद्धतीने तो प्रत्येक अंकाच्या सर्व प्रतींतून प्रसिद्ध करण्यात येईल.

## बृहन्महाराष्ट्र

१. बृहन्महाराष्ट्र परिचय पुस्तिका - बृहन्महाराष्ट्रातील तसेच विदेशांतील मराठी भाषकांच्या संस्थांचे स्वरूप, उद्दिष्टे, कार्य इत्यादींचा परिचय करून देणारी पुस्तिका प्रकाशित करण्यात येईल. 'राज्य मराठी विकास संस्था' यासाठी योजना तयार करील व राबवील.

२. बृहन्महाराष्ट्र मंडळ साहाय्य - महाराष्ट्राबाहेर अन्य राज्यांत मराठी भाषा, साहित्य आणि महाराष्ट्रीय संस्कृती या संदर्भात कार्य करणाऱ्या मान्यताप्राप्त संस्थांना तसेच महाराष्ट्राबाहेर मराठी ग्रंथ प्रकाशनाचे दर्जेदार कार्य करणाऱ्या संस्थांना अर्थसाहाय्य देण्यात येईल.

३. संस्कृती परिचय अभ्यासक्रम - अलीकडच्या काळात महाराष्ट्रीय व्यक्ती शिक्षण, नोकरी, व्यवसाय, वास्तव्य, पर्यटन इ० उद्देशांनी परप्रांतांत व परदेशांत मोठ्या संख्येने जाऊ लागल्या आहेत. अशा उद्देशांनी प्रवास

करणाऱ्या व्यक्तींना त्या-त्या ठिकाणची सांस्कृतिक मूल्ये, शिष्टाचार, कायदेकानून, वेशभूषा, संभाषणशैली, आहार, हवामान इत्यादींची योग्य ती माहिती असणे आवश्यक असते. तसेच, महाराष्ट्रीय आणि भारतीय संस्कृतीविषयीही मुलभूत आणि वस्तुनिष्ठ माहिती असणे आवश्यक असते. सांस्कृतिक देवाण-घेवाण विधायक रीतीने होण्यासाठी आणि तिथल्या वास्तव्यात समायोजन होण्यासाठी अशी दोन्ही प्रकारची माहिती उपकारक ठरते. अशा प्रकारे अन्यत्र जाऊ इच्छिणाऱ्या महाराष्ट्रीय/मराठी व्यक्तींना या बाबतीत मार्गदर्शन करण्यासाठी विद्यापीठ पातळीवर लघुमुदतीचे अभ्यासक्रम सुरू करण्यात येतील.

## अनुवाद

१. मराठीचा वापर व दुभाष्यांची मदत - राज्य शासनाचे मंत्री, प्रशासकीय प्रमुख, तसेच विभागप्रमुख इ० मान्यवरांनी शासकीय, सार्वजनिक कार्यक्रमांत बोलताना शक्यतो मराठी भाषेत बोलावे, अशी अपेक्षा ठेवण्यात येईल. अमराठी, विशेषतः परदेशांतील प्रतिनिधी यांच्यासमवेत होणाऱ्या अधिकृत बैठका / कार्यक्रम यांमध्ये संवाद साधताना मराठीचे भाषांतर करण्यासाठी दुभाष्याची / अनुवादकाची मदत घेण्यात येईल. त्यामुळे मराठीचे महत्त्वाचे स्थान अधोरेखित होईल, मराठी भाषकांचे अनुवादकौशल्य विकसित करण्यासाठी चालना मिळेल आणि मराठी भाषकांना अनुवादक म्हणून व्यवसायही प्राप्त होईल.

२. अनुवाद प्रशिक्षण - मराठी-इंग्रजी, मराठी-हिंदी आणि इंग्रजी-मराठी, हिंदी-मराठी अशा अनुवादाच्या प्रशिक्षणाचे अभ्यासक्रम राज्य मराठी विकास संस्थेमार्फत सुरू करण्यात येतील. तसेच, अनुवादविषयक कार्यशाळा / शिबिरे आयोजित करण्यात येतील. इतर भाषांच्या बाबतीतही आवश्यकतेनुसार शक्य तिथे असे प्रयत्न करण्यात येतील.

३. मराठी ग्रंथ अनुवाद प्रोत्साहन - मराठीतील उत्तम साहित्यकृती अन्य भारतीय भाषांमध्ये विशेषतः हिंदी आणि इंग्रजी भाषांमध्ये अनुवादित होण्यासाठी उपक्रम राबविण्यात येईल. 'महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ'/ 'मराठी भाषा विकास संस्था' यांच्यामार्फत ग्रंथांतील मजकुराचा थोडक्यात सारांश आणि लेखकाचा परिचय हिंदी आणि इंग्रजी भाषांमध्ये अखिल भारतीय स्तरावरच्या सर्व भाषांमधील महत्त्वाच्या प्रकाशकांना पाठविण्यात येईल. येथून पुढे ज्या ग्रंथांना शासनातर्फे पुरस्कार देण्यात येतील, ते ग्रंथ यासाठी निवडले जातील.

४. संतवचनांचे अनुवाद - महाराष्ट्रातील संतांच्या निवडक वचनांचे अनुवाद देशातील भाषांमध्ये, तसेच परदेशांतील काही महत्त्वाच्या भाषांमध्ये प्रकाशित करण्यात येतील. महाराष्ट्राबाहेरील भारतीय संतांच्या निवडक वचनांचे अनुवाद मराठी भाषेमध्ये प्रकाशित करण्यात येतील.

५. इंग्रजी भाषेवर प्रभुत्व - सध्या इंग्रजी भाषेला वेगवेगळ्या कारणांनी जागतिक पातळीवर पूर्वीपेक्षाही अधिक महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले आहे. विविध क्षेत्रांत जगभर होणारे अत्याधुनिक संशोधन आणि इतर घडामोडी यांची माहिती त्वरित उपलब्ध होण्यासाठी, ती माहिती तत्परतेने मराठीमध्ये भाषांतरित करण्यासाठी, तसेच नोकरी, व्यवसाय इ० बाबतीत यश मिळविण्यासाठी मराठी भाषकांना इंग्रजी भाषा उत्तम रीतीने अवगत होणे गरजेचे झाले आहे. त्यांना लिखित व मौखिक इंग्रजीचे नीट आकलन, तसेच इंग्रजीमध्ये प्रभावी लेखन आणि प्रवाही संभाषण या मार्गांनी इंग्रजी भाषेवर प्रभुत्व प्राप्त करता यावे, यासाठी राज्य शासन विविध उपक्रम राबवील. शालेय आणि महाविद्यालयीन स्तरांवरील अध्यापनाबरोबरच बहि:शाल स्वरूपात इंग्रजीचे शिक्षण उपलब्ध करून देण्यासाठी संभाषणाचे वर्ग, अनुवादाच्या कार्यशाळा इ० उपक्रमांना शासन अर्थसाहाय्य देईल.

**अमराठी भाषकांसाठी उपक्रम**

१. अन्य भाषांसाठी अकादमी - महाराष्ट्र शासनाने हिंदी, गुजराती, सिंधी आणि उर्दू भाषांतील साहित्यासाठी चार स्वतंत्र अकादमी स्थापन केल्या आहेत. यांपैकी प्रत्येक अकादमीला दरवर्षी आवश्यकतेनुसार पुरेशी आर्थिक तरतूद उपलब्ध करून देण्यात येईल. या अकादमींची माहिती गुजरात शासनाला कळविण्यात येईल. गुजरात राज्याची मातृभाषा असलेल्या गुजराती भाषेची अकादमी महाराष्ट्रात स्थापन करण्यात आलेली आहे, त्याच धर्तीवर गुजरात राज्याने मराठी अकादमीची स्थापना करावी, अशी विनंती गुजरात शासनाला करण्यात येईल. याच पद्धतीने हिंदी मातृभाषा असलेल्या राज्य शासनांना या अकादमींची माहिती कळवून त्यांना त्यांच्या-त्यांच्या राज्यात मराठी अकादमीची स्थापना करण्याची विनंती करण्यात येईल.

२. अमराठी भाषकांसाठी प्रकाशने - मराठी भाषेखेरीज एखादी अन्य भारतीय / विदेशी भाषा ही ज्यांची मातृभाषा असेल, त्यांना मराठी भाषा शिकण्यासाठी आवश्यक अशा पाठ्यपुस्तकांची निर्मिती करणाऱ्या



अनुक्रमणिका

व्यक्तींना / संस्थांना अर्थसाहाय्य देण्यात येईल. तसेच, त्या भाषांतील शब्दांचे मराठी अर्थ देणाऱ्या आणि मराठी भाषेतील शब्दांचे त्या भाषांतील अर्थ देणाऱ्या शब्दकोशांची निर्मिती करणाऱ्या व्यक्तींना/संस्थांना अर्थसाहाय्य देण्यात येईल. या प्रकल्पासाठी आवश्यकता असल्यास परदेशस्थ महाराष्ट्रीय व्यक्तींचा / संस्थांचा आर्थिक व अन्य प्रकारचा सहभाग मिळविण्यात येईल. यासाठी आवश्यक ती योजना 'राज्य मराठी विकास संस्था' किंवा 'राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ' तयार करील.

३. अमराठी भाषकांसाठी व्यवहारोपयोगी मराठी - अमराठी भाषकांसाठी व्यवहारोपयोगी मराठी शिकविण्याची सोय उपलब्ध करून देणाऱ्या व्यक्तींना / संस्थांना प्रोत्साहन देण्यात येईल.

**लेखन**

१. युनिकोडचा अधिकृत वापर - संगणक माध्यमात देवनागरी लिपीच्या उपयोगाबाबत सर्वत्र एकवाक्यता नसल्याने मराठीतून संगणकीय संवाद साधण्यास मर्यादा येतात. म्हणून, जागतिक पातळीवर सर्व प्रमुख संस्थांनी एकत्र येऊन युनिकोडच्या अंतर्गत विकसित केलेल्या देवनागरी लिपीच्या प्रमाणित संस्करणाचा शासनव्यवहारात अधिकृत वापर करणे बंधनकारक करण्यात येईल. त्यामुळे सर्वसामान्य जनता आणि शासन यांना संगणकाच्या माध्यमातून परस्परांशी संवाद साधणे सोपे होईल. आवश्यकता असल्यास संबंधितांकडून युनिकोडमधील त्रुटी दूर करण्यात येतील.

२. 'शुद्ध' नव्हे, 'प्रमाण' लेखन - लेखनाच्या बाबतीत सर्वत्र आणि विशेषत: अध्ययन-अध्यापन या क्षेत्रात प्रमाण-लेखनाला शुद्धलेखन संबोधले जाते. त्याऐवजी प्रमाण-लेखन असे संबोधण्यात येईल.

३. मुद्द्यांच्या मांडणीसाठी वर्णक्रम - लेखनामध्ये एखाद्या मुद्द्याच्या मांडणीचे विशिष्ट पद्धतीने वर्गीकरण करताना क्रमश: 'अ', 'ब', 'क', 'ड' इत्यादी अक्षरांचा उपयोग करून उपमुद्द्यांची मांडणी करण्याची पद्धत आपल्याकडे बरीच रूढ झाली आहे. ही अक्षरे इंग्रजी भाषेतील 'A', 'B', 'C', 'D' इ. वर्णांचा क्रम व उच्चार यांना अनुसरणारी आहेत. मराठी भाषेमध्ये लेखन करताना अशा प्रकारे इंग्रजी वर्णमालेतील वर्णांचा क्रम अनुसरण्याऐवजी मराठी वर्णमालेनुसार 'अ', 'आ', 'इ', 'ई' इत्यादी अक्षरांचा उपयोग करण्याची पद्धत स्वीकारण्यात येईल.

४. कार्यक्रमफलक मराठीत - राज्य शासनाच्या सर्व कार्यक्रमांत मंचावर दर्शनी भागात लावण्यात येणाऱ्या माहितीफलकावरील कार्यक्रमविषयक मजकूर प्रथम ठळक अक्षरात मराठीमध्ये असेल आणि त्यानंतर आवश्यकतेनुसार अन्य भाषेत/भाषांत असेल.

५. सूचनाफलक लेखन - शासकीय व निमशासकीय कार्यालये, शाळा, महाविद्यालये, विद्यापीठे इ० ठिकाणी मराठी भाषेतून विविध सूचना देणारे फलक लावले जात असतात. अशा फलकांवरील सूचनांचे लेखन प्रमाण-मराठी भाषेच्या नियमांचे पालन करणारे असावे, अशी अपेक्षा असते. या सूचना फलकांवर लिहिण्यापूर्वी त्या बिनचूक असल्याची खातरजमा जाणकार व्यक्तींकडून करून घेण्याविषयी संबंधितांना सांगण्यात येईल. सूचनाफलक लावण्याच्या प्रक्रियेतील महत्त्वाचा घटक म्हणून या बाबीकडे पाहिले जाईल.

**परिशिष्ट क्र० १**

लेखनपद्धती/वाक्प्रयोग पुनर्विचार समितीपुढे ठेवण्यात यावयाची उदाहरणे

अ) खालील चुकीच्या परंतु रूढ झालेल्या शब्दांना वैकल्पिक तद्भव रूप म्हणून मानावे काय?

| **मूळ शब्द** | **रुढ झालेले शब्द** | **मूळ शब्द** | **रुढ झालेले शब्द** |
|---|---|---|---|
| तज्ज्ञ | तज्ञ | अट्टहास | अट्टाहास |
| उपाहारगृह | उपहारगृह | साहाय्य | सहाय्य |
| उपर्युक्त | उपरोक्त | सर्जन | सृजन |
| सामग्री | सामुग्री | देदीप्यमान | दैदीप्यमान |
| कोट्यवधी | कोट्यावधी | म्लेच्छ | म्लेंच्छ |
| मथितार्थ | मतितार्थ | व्यक्तिमत्त्व, | व्यक्तिमत्व, |
| ब्रह्मदेव, ब्राह्मण | ब्रम्ह, ब्रम्हदेव, ब्राम्हण | | |
| महत्त्व, तत्त्व इत्यादी | महत्व, तत्व इत्यादी | | |

आ) संस्कृतमध्ये असलेल्या अर्थापेक्षा मराठीत विरुद्ध/वेगळ्या अर्थाने रूढ झालेल्या 'अपरोक्ष' इत्यादी शब्दांना प्रमाण-शब्द म्हणून मान्यता द्यावी काय?

इ) चुकीच्या पद्धतीने रूढ झालेल्या पुढील शब्दांसारख्या शब्दांना प्रमाण मानू नये काय? -

| प्रमाणशब्द | रूढ झालेले चुकीचे शब्द |
|---|---|
| सयुक्तिक | संयुक्तिक |
| व्यंग्यचित्र | व्यंगचित्र |
| विरोध | विरोधाभास |
| दुरवस्था | दुरावस्था |
| पृष्ठ | (पृष्ठ या अर्थाने वापरला जाणारा) 'पान' |
| मग्न, कार्यमग्न | ('मग्न' या अर्थाने वापरला जाणारा) 'व्यस्त' |
| प्रेक्षक | 'प्रेक्षक' या अर्थाने वापरला जाणारा 'दर्शक' |

ई) मोडी लिपीमध्ये एकच वेलांटी व एकच उकार असतो. मराठीमध्ये देवनागरीसाठी हीच लेखनपद्धती स्वीकारता येईल काय?

उ) विरामचिन्हे वापरण्यासंदर्भात निश्चित धोरण नव्याने तयार करणे आवश्यक आहे काय?

ऊ) या समितीने मराठीमधील शब्दांच्या समासांविषयी नव्याने विचार करावा. उदा० 'क्रीडानैपुण्यविकास' असा समास करण्याऐवजी 'क्रिडा नैपुण्य विकास' असे लिहिणे विकल्पाने प्रमाण मानावे काय?

ऋ) 'मोहिमेंतर्गत', 'शाळेंतर्गत', 'योजनेंतर्गत' असे पूर्वरूप संधी मान्य करावेत काय?

ऌ) शब्दांना शब्दयोगी अव्यये जोडण्याच्या बाबतीत निश्चित नियम करण्याची गरज आहे काय?

## परिशिष्ट क्र० २

### अप्रयोगार्ह शब्दसूची तयार करणाऱ्या समितीपुढे विचारार्थ ठेवावयाची उदाहरणे

| अप्रयोगार्ह शब्द | प्रयोगार्ह शब्द | अप्रयोगार्ह शब्द | प्रयोगार्ह शब्द |
|---|---|---|---|
| धेडगुजरी | संमिश्र, संकरित | चांभारचौकशा | नसत्या चौकशा |
| चांभार | चर्मकार | मांग | मातंग |
| भंगी | सफाई कामगार | न्हावी | नाभिक |
| बुद्दू (बुद्धू) | मूर्ख | च्यायला, आयला | अरेच्चा |
| बाटगा | धर्मांतरित | खेळखंडोबा | विचका |
| वेश्या | देहविक्रय करणारी व्यक्ती | | |
| मलपृष्ठ | (मूलपृष्ठ; किंवा नवीन शब्द तयार करणे) | | |
| गांवढळ, खेडवळ, ग्राम्य | ग्रामीण, खेडूत | | |

# वि०भि० कोलते आणि मराठी विद्यापीठ

न०ब० पाटील

स्वतंत्र ‘मराठी विद्यापीठ’ या आपल्या संपादकीयावरील डॉ० वि०बा० प्रभुदेसाई यांचा प्रतिसाद वाचला. (भाषा आणि जीवन, हिवाळा २०१०)

मराठी विद्यापीठाची संकल्पना हिरिरीने प्रथम मांडली ती डॉ० वि०भि० भाऊसाहेब कोलते यांनीच. तीही सहा दशकांपूर्वी. डॉ० कोलते १९६४मध्ये विदर्भ महाविद्यालय, अमरावती येथे प्राचार्य म्हणून आले, त्या वेळी मी त्या महाविद्यालयात त्यांचा प्रशासनिक सहायक (प्रबंधक) होतो. डॉ० कोलते यांचे महाविद्यालय प्रशासन मराठी अभिमुख करण्याचे सर्व प्रयत्न मी जवळून पाहिलेत आणि या त्यांच्या मोहिमेत मी शिलेदाराची भूमिका बजावली, याचा मला अभिमान वाटतो. १९६६मध्ये नागपूर विद्यापीठाच्या कुलगुरुपदाची सूत्रे हाती घेतल्यानंतर त्यांनी हिरिरीने विद्यापीठाच्या प्रशासनात मराठीचा वापर सुरू केला. नागपूर विद्यापीठाचा नवा परिसर विकसित झाला, तोही त्यांच्याच कारकिर्दीत. महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळाचे कामही याच काळात त्यांनी प्रा० वामनराव चोरघडे यांच्याकडे सापवले. शास्त्रीय व तांत्रिक विषयांवरील अनेक ग्रंथ त्या कालखंडात या ग्रंथनिर्मिती मंडळाने तज्ज्ञ प्राध्यापकांकडून लिहून घेतले व प्रकाशित केले. डॉ० भाऊसाहेब कोलते यांच्या संपर्कात आलेले प्राध्यापक मराठी माध्यमाचा आग्रह धरीत. परंतु अन्य प्राध्यापकांनी मात्र मराठी माध्यमाचा आग्रह धरला नाही. आम्हांला आमचे विषय मराठी माध्यमातून शिकवणे जड जाते. आम्हांला निवृत्त होऊ द्यां आणि मग मराठी माध्यम सुरू करा. ह्या अशा प्राध्यापकांच्या कदुष्म (ल्युकवॉर्म) वृत्तीमुळे विद्यापीठ स्तरावरील शास्त्रीय विषयांच्या बाबतीत मराठी माध्यमाचा प्रश्न पुढे बारगळला आणि महाविद्यालयांत मराठी माध्यम स्थिरावू शकले नाही. नंतरच्या कुलगुरूंनीही (महाराष्ट्रातील सर्वच विद्यापीठांच्या) हा प्रश्न तडीस नेला नाही. मराठी सिद्ध झालेल्या सर्वच ग्रंथांकडे प्राध्यापक व विद्यार्थी यांनी दुर्लक्ष केल्यामुळे हे सारे ग्रंथ महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळाच्या कपाटांमध्ये व शासकीय मुद्रणालयाच्या गोदामांमध्ये राहिले. प्राध्यापकांपर्यंत व विद्यार्थ्यांपर्यंत पोहोचलेच नाहीत.

डॉ० कोलते हे भाषा सल्लागार मंडळाचे १९६१पासून अगोदर सदस्य व नंतर अध्यक्ष होते. या मंडळाच्या मार्गदर्शनाखाली विविध शास्त्रीय व तांत्रिक विषयांचे कोष तज्ज्ञ प्राध्यापकांच्या सहभागाने भाषा संचालनालयाने गेल्या चाळीस वर्षांत प्रकाशित केले आहेत. या शैक्षणिक उपक्रमात मराठी विज्ञान परिषदेचाही बराच मोठा वाटा आहे. शास्त्रीय व तांत्रिक शब्दावली निर्मितीच्या आणि प्रसाराच्या कामात सुरुवातीपासूनच मराठी विज्ञान परिषद सहभागी होती.

तिसांहून अधिक अशा शास्त्रीय परिभाषा कोषांचा उठाव महाविद्यालयांतून कमीच झाला, असे म्हणावे लागेल. कारण फारच थोड्या परिभाषा कोषांच्या दुसऱ्या आवृत्त्या निघाल्या. पारिभाषिक शब्द हे वापरामुळे भाषेला समृद्धी आणतात. शक्य तेथे मानक पारिभाषिक शब्दांचा वापर विद्यार्थ्यांनी, प्राध्यापकांनी आणि जनतेने करणे हे भाषेच्या अभिवृद्धीसाठी नितांत आवश्यक आहे. तसा जाणीवपूर्वक प्रयत्न सर्वांनीच केला पाहिजे.

मराठी विद्यापीठ संस्थापित झाल्यास सध्या मराठीसाठी काम करणारी जी शासकीय व निमशासकीय मंडळे आहेत ती, एका छत्राखाली येतील. त्यांच्या कार्यामध्ये समन्वय ठेवण्याचे काम सोपे होईल. स्वायत्तेमुळे मराठीचा विकास काळानुरूप वेगाने होईल. महाराष्ट्र वैभवाचे शिखर गाठू शकेल.

■

अ-37, कमलपुष्प,
जन० अरुणकुमार वैद्य मार्ग, वांद्रे रेक्लमेशन (प०) मुंबई 400 050
दूरभाष : (022) 2642 9309

**परीक्षणासाठी आलेली पुस्तके**

मंगल तोरण - मदन धनकर, हरिवंश प्रकाशन, चंद्रपूर, पृष्ठे ११२, किंमत रु० ८०/-

रुबाइयत - डॉ० शेख इक्बाल मिन्ने, विश्वगजल प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ६५+६६, किंमत रु० १००/-

# मराठी विद्यापीठ

सदाशिव देव

१. 'भाषा आणि जीवन'मध्ये अभ्यासपूर्ण लेख प्रसिद्ध होत असतात. असे लेख संपादन करून त्यांची विषयवार विभागणी करून ते प्रसिद्ध पुस्तकरूपाने झाले तर मराठीच्या अभ्यासकांना ते संकलित स्वरूपात मिळतील. अधिक संशोधनासाठी ते उपयुक्त ठरतील. असे नवीन विचारधन विस्मृतीमध्ये जाऊ नये यासाठी असा प्रकल्प याच त्रैमासिकाने योजावा असे मला वाटते.

२. याच अंकात प्रा० वि०बा० प्रभुदेसाई यांचा प्रतिसाद विभागात 'स्वतंत्र मराठी विद्यापीठ' हा लेख वाचला. ज्येष्ठ साहित्यिक डॉ० वि०भि० कोलते यांचा हा विचार पुन्हा एकदा मराठी वाचकांच्यासमोर प्रा० प्रभुदेसाई यांनी मांडला याबद्दल मी त्यांचे अभिनंदन करतो.

गेल्या काही दशकांत भारतात संस्कृत, हिंदी, कन्नड, तेलुगू, तमीळ या भाषांच्या अभ्यासासाठी विद्यापीठे निर्माण झाली आहेत व त्यांना सरकारी मान्यता आहे. पण ही विद्यापीठे त्या-त्या भाषांच्या सखोल अभ्यास करण्याबरोबर त्या भाषांतून अन्य विषयांचे अध्यापन आणि संशोधन करताना मात्र दिसत नाहीत. विद्यापीठ या नावाला साजेल असे ज्ञानक्षेत्र निर्माण करायचे तर सर्व मानव्यविद्या, विज्ञाने, अभियांत्रिकी, तंत्रज्ञान, आयुर्विज्ञान इत्यादी विषयांचे पदव्युत्तरपर्यंतचे व संशोधन-पदवीपर्यंतचे ज्ञान त्याच भाषांतून दिल्याशिवाय ही विद्यापीठे पूर्ण अर्थाने ज्ञानकेंद्रे होणार नाहीत.

डॉ० वि०भि० कोलते यांनी केलेली मराठी विद्यापीठाची कल्पना ही या अर्थाने व्यापक आणि अर्थपूर्ण आहे. या मार्गानेच मराठी भाषा 'ज्ञानभाषा' या अभिमानास्पद पदावर आरूढ होईल. 'भाषा आणि जीवन' या त्रैमासिकाने या प्रकल्पाला प्राधान्य देऊन अधिक प्रबोधन करावे व अशा शासकीय निर्णयासाठी व्यापक पार्श्वभूमी तयार करावी अशी सूचना आहे.

■

12, प्रेसी बिल्डिंग, मळा, पणजी (गोवा), 403 001
दूरभाष : (0832) 222 5816

प्रतिसाद ३

# मराठी शब्दांच्या जागी हिंदी शब्द

शकुंतला क्षीरसागर

उज्ज्वला बर्वे यांनी 'मराठीवरील हिंदीचा प्रभाव' (भाषा आणि जीवन, वर्ष २८, अंक १ : हिवाळा २०१०) या लेखात चित्रवाणीवरील मराठी वृत्तवाहिन्यांच्या वृत्तलेखनात तसेच आकाशवाणीवरील मराठी बातमीपत्रात आढळणाऱ्या हिंदीच्या प्रभावाची अनेक उदाहरणे दिली आहेत.

या लेखाच्या शेवटी परिच्छेदातील उपहास संबंधितांपर्यंत पोचला तर काही सुधारणा होईल असे वाटते.

प्रमाण-मराठीत प्रचलित असलेले शब्द टाळून हिंदी भाषेतील शब्दांचा उपयोग करण्याकडे वृत्तपत्रांत लिहिणाऱ्या लेखकांचाही कल दिसून येतो.

२८ जानेवारी आणि ३० जानेवारी २०१० या तारखांच्या दोन वृत्तपत्रांमध्ये आढळलेली दोन उदाहरणे पुढे दिली आहेत :

१) 'नादब्रह्म म्हणजे लोकसंगीत, नृत्य, नाट्य, वाद्य, आदिवासी कला यांचा एक महत्त्वपूर्ण दस्तावेज आहे.' येथे 'दस्तऐवज' हा मराठी शब्द न वापरता 'दस्तावेज' हा हिंदी शब्द वापरला आहे.

२) 'त्यानंतरच्या वर्षी ढासळत चाललेल्या कुटुंबव्यवस्थेसंबंधी उपाययोजनांची प्रदर्शनी करण्यात आली.' येथे 'प्रदर्शन' हा रूढ मराठी शब्द टाळून 'प्रदर्शनी' हा हिंदी शब्द वापरला आहे.

29/418, लोकमान्यनगर, पुणे 411 030

**मुलांची चित्रकला**

''रॅफेलसारखं रंगचित्रण करायला मला चार वर्षं लागली, पण लहान मुलांसारखं रंगचित्रण करायला सारं आयुष्य खर्च करावं लागलं.''

- पाब्लो पिकासो





अनुक्रमणिका

# अठरा विश्वे

विजय पाध्ये

'अठरा विश्वे' या शब्दप्रयोगाविषयी डॉ० ब्रह्मानंद देशपांडे ह्यांनी 'भाषा आणि जीवन' च्या पावसाळा २००९ च्या अंकात, विसोवा ह्या नाण्याचा उल्लेख केला आहे, त्याला पुष्टी मिळेल असा एक दाखला मला ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायांत मिळाला. मन कसे चंचल आहे ते अर्जुनाने भगवंताला सांगितले आहे :

**ह्मणौनि मन येक निश्चल राहील। मग आह्मांसि साम्य येईल।**
**हें विस ही विश्वे न घडैल । तें एआ लागि ।। ६.४१६।।**

(म्हणून मन थोडेसे निश्चल राहील, (आणि) मग आम्हांला समत्वबुद्धी येईल हे विसांतल्या वीसही विश्वांनी (म्हणजे - शंभर टक्के) घडावयाचे नाही, ते यामुळे(च) - 'ज्ञानदेवी', संपा० अरविंद मंगरूळकर, विनायक मोरेश्वर केळकर, खंड १, पान ३५३)

विश्वा, विस्वा किंवा विसोवा हे एक नाणे होते आणि त्याचे मूल्य मोठ्या नाण्याच्या एक विसांश होते. 'विस ही विश्वे' म्हणजे वीसपैकी वीस, म्हणजेच शंभर टक्के.

ज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायातही असाच उल्लेख आला आहे. 'जय कोणाचा होईल?' असे धृतराष्ट्राने संजयाला विचारले, पण त्याआधी आपला अंदाज सांगताना तो म्हणाला,

**यऱ्हवीं विश्वे बहुत एक । आमचें ऐंसें मानसिक ।**
**जे दुर्योधनाचे अधिक । प्रताप सदा ।।१८.१६०९।।**

विश्वे बहुत एक म्हणजे बव्हंशी, पुष्कळ टक्क्यांनी; ह्यावरून अठरा विश्वे दारिद्र्य म्हणजे ९० टक्के दारिद्र्य असा अर्थ प्रा० श्री०मा० कुलकर्णी ह्यांनीही दिला आहे. ('संशोधन सुमने', गुच्छ दुसरा, पान १५२) आणि तो डॉ० ब्रह्मानंद देशपांडे ह्यांच्या स्पष्टीकरणाशी जुळतो.

■

4 चित्रा 'बी', विद्यासागर सोसायटी, बिबवेवाडी पुणे 411 037
दूरभाष : (020) 2421 1951, भ्रमणभाष : 098220 31963
ई-पत्ता : v.padhye@gmail.com

# राज्यभाषा संस्कृत!

मंगळवार दि० १९ जानेवारी, २०१० हा दिवस संस्कृत भाषेच्या दृष्टीने क्रांतिकारक व ऐतिहासिक ठरावा. या दिवशी उत्तराखंड राज्याच्या शासनाने संस्कृतला द्वितीय राज्यभाषा म्हणून मान्यता दिली. संस्कृतचे कमीअधिक अस्तित्व भारताच्या सर्व राज्यांत असले तरी कुठल्याही राज्यात ती 'राज्यभाषा' नव्हती. उत्तराखंडच्या विधानसभेने हिंदी ही राज्यभाषा व संस्कृत ही द्वितीय राज्यभाषा करण्याच्या प्रस्तावाला मान्यता दिली. संस्कृतच्या शिक्षणासाठी स्वतंत्र खातेही निर्माण करण्यात आलेले आहे. आपण संस्कृतचा प्रसार करू इच्छितो असे मुख्यमंत्री रमेश पोखरियाल यांनी जाहीर केले आहे. 'आवश्यक विषय' म्हणून शालेय विद्यार्थ्यांना संस्कृतचा अभ्यास करावा लागणार आहे. नोकऱ्यांच्या संधींशीही संस्कृतचा संबंध जोडण्यात येणार आहे.

हिंदुस्तान टाइम्स<br>
दि० १९ जानेवारी २०१०

**भाषेचे वय**

भाषातज्ज्ञांच्या म्हणण्यानुसार, संवाद-शब्द-भाषा-लिपी आणि त्यांचे अर्थ व संदर्भ हा सगळा खेळ जास्तीत जास्त पाच-सात हजार वर्षांचा आहे. काही कट्टरपंथीय ज्यू म्हणतात, त्यांची हिब्रू भाषा सर्वांत प्राचीन - सात-आठ हजार वर्षांची! काही आग्रही व अभिमानी भारतीय म्हणतात, संस्कृत त्याहूनही जुनी! तर काही चिनी अस्मितावादी म्हणतात, त्यांची भाषा १५ हजार वर्षे वयाची आहे. हे सर्व 'भाषिक' वाद चालूच राहतील. संशोधनाला अस्मितेचे परिमाण लाभले की असे होणे अपरिहार्य आहे.

- कुमार केतकर,<br>
दै० लोकसत्ता, दि० २९ ऑगस्ट २००९<br>
(प्रेषक : दिशा केळकर)

# 'केहवत-माला'

जमशेदजी नसरवानजी पितीत यांनी १२ हजार गुजराती म्हणी आणि त्यांचे संस्कृत, मराठी, हिंदी, कश्मिरी, तमिळ, तेलुगू, बंगाली, इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, इटालियन, स्पॅनिश, पोर्तुगीज, डच, डेनिश, लॅटिन, फारसी आदी भाषांमध्ये अनुवाद किंबहुना त्या म्हणींना समांतर अशा म्हणी संकलित व संपादित करून ते पुस्तकरूपाने लोकांसमोर आणले होते.

गेली १००हून अधिक वर्षे हे पुस्तक उपलब्ध नव्हते. योगायोगाने मुंबईतील सोमय्या कॉलेजचे निवृत्त प्राध्यापक दीपक मेहता यांना या पुस्तकाची एक जुनी प्रत जुहू येथील फार्बस लायब्ररीत सापडली आणि एका पुस्तकाचा पुनर्जन्म झाला.

'केहवत-माला' हे पुस्तक सापडल्याचे कळताच महाराष्ट्र राज्य गुजराती साहित्य अकादमीचे कार्याध्यक्ष हेमराज शहा यांनी या पुस्तकाचे पुन:प्रकाशन करण्याचा निर्णय घेतला आणि मुख्यमंत्री अशोक चव्हाण यांनी अकादमीला जाहीर केलेल्या दोन लाखांच्या अनुदानातून एका महिन्यात साडेबाराशे पानांचे दोन खंडांतील पुस्तक तयार झाले. विशेष म्हणजे, संपूर्ण पुस्तक फॅक्सिमिली पद्धतीने छापलेले आहे. म्हणजे मूळ पुस्तक जसेच्या तसे, त्यात काना-मात्रेचाही फेरफार न करता १२०० पानांचे हे दोन खंड सवलतीच्या दरात म्हणजे केवळ सहाशे रुपयांत उपलब्ध आहेत.

साप्ताहिक 'लोकप्रभा'
दि० ५ फेब्रुवारी २०१०

'मराठी अभ्यास परिषदे'च्या आजीव सदस्यांनी तसेच वर्गणीदारांनी आपला अद्ययावत टपाल-पत्ता, दूरभाष व भ्रमणभाष क्रमांक आणि ई-पत्र पत्ता कृपया कळवावा. त्यामुळे संपर्क साधणे सुलभ होईल.



अनुक्रमणिका

# डॉ० द०भि० कुलकर्णी आणि विश्वनाथ खैरे यांचा सत्कार

मराठी अभ्यास परिषद, पुणे विद्यापीठाच्या मराठी विभाग आणि संज्ञापन व वृत्तपत्रविद्या विभाग यांच्या वतीने डॉ० द०भि० कुलकर्णी यांची अ०भा० मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी निवड झाल्याबद्दल आणि श्री० विश्वनाथ खैरे यांना साहित्य अकादमी भाषासन्मान मिळाल्याबद्दल जाहीर सत्कार करण्यात आला. सोमवार, दि० १ फेब्रुवारी २०१० रोजी सायंकाळी ६ वाजता वृत्तपत्रविद्या विभागाच्या रानडे इन्स्टिट्यूट येथील सभागृहात झालेल्या या कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी प्रा० कृ०श्री० अर्जुनवाडकर होते.

मराठी विभागाचे प्रमुख प्रा० डॉ० मनोहर जाधव यांनी समीक्षा आणि भाषिक संशोधन याला वाहून घेणाऱ्या या सत्कारमूर्ती आजच्या विद्यार्थ्यांसाठी आणि संशोधकांसाठी दीपस्तंभासारख्या आहेत, असे आपल्या प्रास्ताविकात सांगितले. वृत्तपत्रविद्या विभागाच्या डॉ० उज्ज्वला बर्वे यांनी माध्यमाचा घनिष्ट संबंध असतो, त्यामुळे या सत्काराचे औचित्य विशेष आहे असे सांगितले.

डॉ० द०भि० कुलकर्णी यांच्या समीक्षालेखनाबद्दल बोलताना डॉ० रेखा इनामदार-साने यांनी, कलाकृतीच्या चिकित्सेमुळे आपला सौंदर्यानुभव अधिकच उत्कट होतो हा अनुभव द०भिं०ची समीक्षा देते असे विविध उदाहरणे देऊन सांगितले. द०भिं०च्या लेखसंग्रहाची शीर्षकेही ललितगद्यासारखी कलात्मक असल्याचे सांगून द०भिं०नी विषयवैविध्य राखले असल्याचेही दाखवून दिले. तर्कशुद्धता आणि वैचारिकता या गुणांनी द०भिं०ची समीक्षा मंडित असल्याने त्यांना हा साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा बहुमान योग्य वेळी लाभलेला आहे असेही त्या म्हणाल्या. त्याचबरोबर ग्रामीण, दलित आणि स्त्रीवादी या १९६० नंतरच्या सशक्त प्रवाहांविषयी द०भि० लिहितील अशी अपेक्षा व्यक्त केली.

श्री० विश्वनाथ खैरे यांच्याविषयी बोलताना प्रा० प्र०ना० परांजपे यांनी साहित्य अकादमीचा मध्ययुगीन भाषाविषयक सन्मान खैरेंना मिळाल्याबद्दल समाधान व्यक्त केले. विल्यम जोन्सपासून समाजात रूढ झालेल्या इंडो-युरोपियन भाषाकुल इ० भाषाविषयक संकल्पनांना संमत विचार मांडून धक्का देण्याचे महत्त्वाचे काम खैरे यांनी केले आणि भारतीय समाजात राजकीय-सांस्कृतिक फूट पाडू इच्छिणाऱ्या मांडणीला आव्हान दिले. त्यामुळेच आज भारतीय भाषांचा अभ्यास करताना खैरेंच्या मांडणीचा विचार केल्याशिवाय पुढे जाता येणार नाही अशा शब्दांत खैरेंचा गौरव केला.

प्रा० अर्जुनवाडकर यांच्या हस्ते सत्कार स्वीकारल्यानंतर डॉ० द०भि० कुलकर्णी यांनी आपले मनोगत व्यक्त केले. 'समीक्षा' या नावाने ओळखले जाणारे बरेच लेखन खऱ्या समीक्षेच्या सरहद्दीबाहेरचे असते. पाठचिकित्सा, समाजशास्त्रीय विश्लेषण, तात्त्विक चर्चा, चरित्रात्मक संशोधन इ० अनेक प्रकारचे लेखन चांगले व उपयुक्त असू शकते; पण ते 'समीक्षा' नसते. खरी समीक्षा सर्जनशील असते, ती कलाकृतीची आंतरसंहिता उलगडून दाखवते. वाङ्मयकृतीला नवा जन्म देणे हे तिचे काम असते. याउलट आस्वादक समीक्षालेखन स्वत:च एक कलाकृती बनू पाहाते आणि मूळ कलाकृतीच्या तुलनेत दुय्यम ठरते. बालकवींच्या 'फुलराणी'ची आंतरसंहिता उलगडून दाखवीत द०भिं०नी आपला मुद्दा स्पष्ट केला.

श्री० खैरे यांनी आपल्या उत्तरात सत्काराविषयी कृतज्ञता व्यक्त करून भाषिक अभ्यासाकडे कुतूहलातून वळल्याचे सांगितले. भारतातील विविध ठिकाणी नोकरीनिमित्त जावे लागल्यामुळे विविध भाषांशी संबंध आला आणि अभियांत्रिकीचे शिक्षण असूनही भाषिक संशोधनाकडे लक्ष दिले. त्यातून जे लेखन झाले ते शंभर टक्के सत्य आहेच अशी माझी भूमिका नाही, पण या दिशेनेही अभ्यास करता येतो आणि तरुण अभ्यासकांनी तो केला, तर माझ्या कामाचे सार्थक झाले असे मी मानतो, असे मनोगत व्यक्त केले.

अध्यक्षस्थानावरून बोलताना श्री० अर्जुनवाडकर यांनी दोन्ही सत्कारमूर्तींचे अभिनंदन केले. त्यांच्या परिश्रमाचा विचार करता हा पुरस्कार मिळाल्यामुळे त्या पुरस्काराचाही सन्मान झाला आहे असे ते म्हणाले.

प्रा० रंजना फडके यांनी सूत्रसंचालन केले तर प्रा०डॉ० प्रसन्नकुमार अकलुजकर यांनी आभार मानले.

- आनंद काटीकर

काही भाषासंशोधक असे मानतात की, मूल जन्माला येतानाच विशिष्ट भाषेचा 'प्रोग्राम' उर्फ 'आज्ञावली' घेऊन येते. परंतु त्या भाषेचा शब्दरूप उच्चार, अर्थपूर्ण वाक्यरचना आणि संवाद या गोष्टी विकसित आणि उत्क्रांत होत जातात.

- कुमार केतकर,
दै० लोकसत्ता, दि० २९ ऑगस्ट २००९
(प्रेषक : दिशा केळकर)

## देणगीदार

| | | |
|---|---|---|
| १) | श्री० अनिल पेंढारकर | रु० ५०००/- |
| २) | प्रा० गंगाधार पाटील, मुंबई | रु० ६००/- |
| ३) | डॉ० नागनाथ कोत्तापल्ले, औरंगाबाद | रु० १०००/- |
| ४) | श्रीमती श्रद्धा काळेले, पुणे | रु० २०००/- |
| ५) | वि०ग० कानिटकर प्रतिष्ठान, पुणे | रु० ५०००/- |
| ६) | म०सु० पाटील, मुंबई | रु० ६००/- |
| ७) | कृ०श्री० अर्जुनवाडकर, पुणे | रु० १०००/- |

## २००९-२०१० या वर्षातील नवीन आजीव सभासद

१) श्री० संजय इंगवले, मंडणगड, रत्नागिरी
२) डॉ० मल्हार कुलकर्णी, मुंबई
३) श्री० चिन्मय धारुरकर, मुंबई
४) श्री० वि०बा० प्रभुदेसाई, गोवा
५) प्रा० कौतिकराव ठाले पाटील, औरंगाबाद
६) डॉ० उज्ज्वला बर्वे, पुणे
७) डॉ० उज्ज्वला देवरे, मालेगाव, नाशिक
८) श्रीमती उषा बाळ, ठाणे
९) डॉ० माधव गाडगीळ, पुणे
१०) श्रीमती अनिता कोरे, पुणे
११) प्रा० अजय देशपांडे, वणी, यवतमाळ
१२) श्रीमती रमा राऊळ, मुंबई
१३) श्री० अनिल शिदोरे, पुणे
१४) प्रा० कीर्ती मुळीक, पुणे
१५) प्रा० कल्याण साठे, बार्शी, सोलापूर
१६) श्री० प्रदीप नेरूरकर, डोंबिवली

## लेखक परिचय

- **अर्जुनवाडकर,** (प्रा०) कृ०श्री०: एम०ए० (संस्कृत), पुणे येथील वाडिया कॉलेज व स०प० महाविद्यालय येथे अध्यापन. १९७९-८६ ह्या काळात मुंबई विद्यापीठात मराठी विभागात प्रपाठक. १९७२-७३ ह्या काळात ब्रिटिश कोलंबिया विद्यापीठ, कॅनडा येथे अभ्यागत प्राध्यापक. काव्यप्रकाश समीक्षा, महाराष्ट्र प्रयोगचंद्रिका व्याकरण, शास्त्रीय मराठी व्याकरण (संपा०), मराठी व्याकरणाचा इतिहास, मराठी व्याकरण-वाद आणि प्रवाद, मोरो केशव दामले यांचे चरित्र इ० ग्रंथ प्रकाशित

- **काटीकर** (प्रा०) आनंद : औषध-निर्माणशास्त्राची पदविका. मराठीमध्ये एम०ए० गेली आठ वर्षे मराठीचे (गेल्या सहा महिन्यांपासून फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे) अध्यापन.

- **केळकर,** (डॉ०) अशोक : शिक्षण, तत्त्वज्ञान, मानसशास्त्र, सांस्कृतिक इतिहास वगैरे अनेक विद्याशाखांत ज्याची पाळेमुळे विस्तारलेली आहेत अशा भाषाशास्त्राचे अधिकारी पंडित; चिकित्सक व चिंतनशील विचारवंत. डेक्कन कॉलेज, पुणे येथून भाषाविज्ञानाचे प्राध्यापक म्हणून निवृत्त. राज्य मराठी विकास संस्था (मुंबई), भारतील भाषा संस्थान (म्हैसूर) व मराठी अभ्यास परिषद (पुणे) ह्या संस्थांच्या स्थापनेशी व संवर्धनाशी निगडित. 'भाषा आणि जीवन'चे आद्य संपादक. 'मध्यमा', 'वैखरी', 'रुजुवात' इत्यादी पुस्तके प्रकाशित.

- **देव** सदाशिव : गणिताचे (निवृत्त) प्राध्यापक. परदेशातही अध्यापन, संशोधन व मार्गदर्शन. सध्या भारतीय विद्याभवन (मुंबई) यांनी योजलेल्या आंतरराष्ट्रीय विद्यापीठ निर्मिती प्रकल्पाचे संचालक.

- **देवळेकर,** सुशांत : एम०ए० (मराठी), सध्या राज्य मराठी विकास संस्था (मुंबई) येथे कनिष्ठ संशोधन-साहाय्यक ह्या पदावर कार्यरत. २००२-०८ ह्या काळात भारतीय तंत्रज्ञान संस्था (आयआयटी) (मुंबई) येथील भारतीय भाषा केंद्रात भाषातज्ज्ञ म्हणून सेवेत. मराठी शाब्दबंध हा शब्दार्थसंबंध दाखवणारा कोश, मराठी शब्दरूपांचे विश्लेषण करणारी रूपविश्लेषक ही संगणक प्रणाली विकसित करण्यात सहभाग. संगणकावर युनिकोड वापरून मराठीत काम कसे करता येईल हे समजावून देणाऱ्या कार्यशाळांत मार्गदर्शन.

- **परांजपे** (प्रा०) प्र०ना० : एम०ए०,पी०जी०डी०टी०इ०,एम०लिट० रामनारायण रुइया महाविद्यालय, मुंबई येथे इंग्रजीचे १५ वर्षे आणि पुणे विद्यापीठात वृत्तपत्र-विद्येचे २० वर्षे अध्यापन. एक कथासंग्रह, तीन भाषांतरे, पाच संपादने, पाच

सहसंपादने व एक सहलेखन अशी १५ पुस्तके प्रकाशित. याव्यतिरिक्त दहा पुस्तकांत लेख समाविष्ट. संगीत नाटक स्पर्धेत लेखनाबद्दल महाराष्ट्र शासनाचे प्रथम पारितोषिक.

- **पाटील,** (डॉ०) न०ब०: एम०ए०, एलएल०बी०. पीएच०डी०, निवृत्त भाषासंचालक. महाराष्ट्र शासन. मानसेवी प्राध्यापक. अनंताचार्य इंडॉलॉजिकल रीसर्च इन्स्टिट्यूट (मुंबई). मन आणि त्याचा निग्रह, स्मृतिकथा इ० ग्रंथ प्रकाशित.

- **पाध्ये** विजय : पुण्यातील तीन उद्योगसमूहांमध्ये विविध उच्च पदांवर ३२ वर्षे नोकरी. १९९८पासून उद्योग समूहांच्या गृहपत्रिकांचे संपादन. अभियांत्रिकी, मानव संसाधन. औद्योगिक संबंध, विकृतिशास्त्र. दूरसंचार इ० क्षेत्रांतील इंग्रजीतील दस्तऐवजांचे मराठीत भाषांतर करण्याचा व्यवसाय.

- **भट-बेहेरे** अनया : पीएच०डी० (रशियन), व्यावसायिक भाषांतरकार. पुणे विद्यापीठाच्या परकीय भाषा विभागात रशियन भाषेचे अध्यापन. २००६मध्ये प्रकाशित झालेल्या रशियन मराठी शब्दकोशाच्या निर्मितीत सहभाग, सध्या मराठी-रशियन-जर्मन अशा त्रैभाषिक कोशाचे काम चालू. 'केल्याने भाषांतर' ह्या त्रैमासिकाच्या सुरुवातीपासूनच्या संपादक

- **भामरे** प्रकाश अर्जुन : एम०ए०,बी०एड०,एम०फिल०, सेट व नेट परीक्षा उत्तीर्ण. मराठी विभागप्रमुख, ग०तु० पाटील महाविद्यालय, नंदुरबार. उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाच्या मराठी अभ्यास मंडळाचे सभासद. प्रथम व द्वितीय वर्ष, कला आणि प्रथम वर्ष, वाणिज्य यांसाठीच्या पाठ्यपुस्तक संपादन मंडळांचे सभासद.

- **मोहिते** शरदिनी (बाबर) : एम०ए० (मराठी व संस्कृत), ६० नियतकालिकांत लेखन. समाज- शिक्षणमालेमध्ये साहित्य, इतिहास, भाषा, भूगोल, मानसशास्त्र इ० विषयांवरील पुस्तके प्रकाशित. बालांसाठी चार कादंबऱ्या. 'थर्ड वेव्ह' (ऑल्विन टॉफ्लर). 'देवदास' व 'परिणीता' (शरचंद्र चतर्जी) या पुस्तकांची भाषांतरे प्रकाशित.

- **क्षीरसागर,** (डॉ०) शकुंतला : एम०ए० (मराठी). पीएच०डी०, ग्रंथालयशास्त्र पदविका. जयकर ग्रंथालयाच्या (पुणे विद्यापीठ) निवृत्त साहाय्यक ग्रंथपाल. 'केशवसुतांच्या कवितेचा शैलीविज्ञानिक अभ्यास' ह्या प्रबंधास मराठी अभ्यास परिषदेचा महाबँक पुरस्कार (१९९५). संपूर्ण केशवसुत व श्रीकेशी : व्यक्ती. टीकादृष्टी आणि टीकासृष्टी हे दोन संपादित ग्रंथ प्रकाशित.



